॥ श्रीहरिः ॥

1006 ▲

# वासुदेवः सर्वम्

## ( मराठी )



गीताप्रेस गोरखपुर

GITA PRESS, GORAKHPUR

स्वामी रामसुखदास

॥ श्रीहरिः ॥

# वासुदेवः सर्वम्

(मराठी)

त्वमेव माता च पिता त्वमेव
त्वमेव बन्धुश्च सखा त्वमेव।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव
त्वमेव सर्वं मम देवदेव॥

स्वामी रामसुखदास

## पुस्तकें यहाँ भी उपलब्ध हैं—

**गीताप्रेस, गोरखपुरकी पुस्तक-दूकान**

१-सूरत— 2016, वैभव एपार्टमेन्ट, भटार रोड, नूतन निवासके सामने ✆ ( 0261 ) 2237362, 2238065
२-मुम्बई— 282, सामलदास गाँधी मार्ग ( प्रिन्सेस स्ट्रीट, मरीन लाईन्स स्टेशनके पास )
✆ ( 022 ) 22030717
३-नागपुर— श्रीजी कृपा कॉम्प्लेक्स, 851, न्यू इतवारी रोड ✆ ( 0712 ) 2734354
४-जलगाँव— 7, भीमसिंह मार्केट, रेलवे स्टेशनके पास ✆ ( 0257 ) 2226393, 2220320
५-औरंगाबाद— रेलवे स्टेशन, प्लेटफार्म नं० १
६-हैदराबाद—दूकान नं० 41, 4-4-1, दिलशाद प्लाजा, सुल्तान बाजार
✆ ( 040 ) 24758311, 66758311

**सं० २०७६ सोलहवाँ पुनर्मुद्रण १,०००**
कुल मुद्रण ६३,०००

❖ **मूल्य—₹८**
**( आठ रुपये )**

प्रकाशक एवं मुद्रक—

**गीताप्रेस, गोरखपुर—२७३००५**

**( गोबिन्दभवन-कार्यालय, कोलकाता का संस्थान )**

फोन : ( ०५५१ ) २३३४७२१, २३३१२५०, २३३१२५१

web : **gitapress.org** e-mail : **booksales@gitapress.org**

**गीताप्रेस प्रकाशन gitapressbookshop. in से online खरीदें।**

॥ श्रीहरिः ॥

# नम्र निवेदन

प्रस्तुत पुस्तकामध्ये परम श्रद्धेय श्रीस्वामीजी महाराजद्वारा प्रसंगानुरूप लिहविले गेलेल्या नऊ लेखांचा संग्रह आहे. हे लेख सर्व बंधू भगिनीसाठी फारच कामाचे आहेत. यामध्ये असे अनेक गहन विषय आले आहेत जे तत्त्वाचा सहज रीतीने अनुभव करविण्यामध्ये फारच सहायक आहेत. साधकांना नम्र विनंती आहे की, त्यांनी तत्त्वप्राप्तीच्या उद्देश्याने या पुस्तकाचे अध्ययन करावे आणि लाभ घ्यावा.

**—प्रकाशक**



॥ श्रीहरिः ॥

# विषय-सूची





॥ श्रीहरि: ॥

# १. वासुदेव: सर्वम्

गीतेमध्ये भगवंतानी एक फार मोठी विलक्षण गोष्ट सांगितली आहे—

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते।**
**वासुदेव: सर्वमिति स महात्मा सुदुर्लभ:॥**

"अनेक जन्मांच्या शेवटी अर्थात मनुष्यजन्मामध्ये "सर्व काही वासुदेवच आहे" असा जो ज्ञानी मला शरण येतो, तो महात्मा* अत्यंत दुर्लभ आहे."

ज्ञान कोणत्या अभ्यासाने उत्पन्न होत नाही, उलट जे वास्तविक आहे, त्याला यथार्थ जाणण्याचे नाव "ज्ञान" आहे. "**वासुदेव: सर्वम्**" (सर्व काही परमात्माच आहे) हे ज्ञान वास्तविक आहेच तसे! हे काही नवीन बनविलेले ज्ञान नाही तर स्वत:सिद्ध आहे. म्हणून भगवंताच्या वाणीतून आपल्याला ही गोष्ट कळून आली की, सर्व काही परमात्माच आहे, ही केवढी आनंदाची गोष्ट आहे. हे अत्यंत उच्च दर्जाचे ज्ञान आहे. यापेक्षा श्रेष्ठ असे दुसरे कोणतेही ज्ञान नाही. कोणी एखाद्याने जरी सर्व शास्त्रांचा अभ्यास केला, वेद पठण केले, पुराणांचा अभ्यास केला तरीही शेवटी हाच निष्कर्ष राहील की, सर्व काही परमात्माच आहे, कारण वास्तविक गोष्ट आहेच अशी!

संसारामध्ये प्राय: कोणीही माणूस हे सांगत नाही की, माझ्याजवळ एवढे धन आहे, एवढी संपत्ती आहे, एवढी विद्या आहे, एवढे

---

* हे मनुष्यशरीर अनेक जन्मांचा अंतिम जन्म आहे. या जन्मात नवीन जन्माची तरतूद करण्यात आली तर नवीन जन्म होईल नाही तर यानंतर जन्म नाही. जन्म संसाराच्या आसक्तीने होतो—"कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु" (गीता १३/२१). आसक्ती नसेल तर जन्म होण्याचे काहीही कारण नाही.

कला-कौशल्य आहे. परंतु भगवंतांनी अत्यंत उच्च महात्म्याच्या हृदयामधील गुप्त गोष्ट आपल्याला सरळ शब्दात सांगितली आहे की, सर्व काही परमात्माच आहे. यापेक्षा अधिक श्रेष्ठ कृपा कोणती होऊ शकते?

जेवढा म्हणून संसार दिसतो तो मग वृक्ष, पाषाण, पर्वत इत्यादीच्या रूपात असो अथवा मनुष्य, पशू, पक्षी इत्यादीच्या रूपात असो, सर्वांमध्ये एक परमात्माच परिपूर्ण आहे. परमात्माच्या ठिकाणीच हा संसार दिसत आहे. बाहेरून संसाराचे जे रूप दिसत आहे, हा तर एक अंगरखा, जो प्रत्येक क्षणाला परिवर्तनशील आहे, नाशवान आहे. परंतु यामध्ये सत्तारूपाने एक परमात्मतत्त्व आहे, जे अपरिवर्तनशील आहे, अविनाशी आहे. चूक ही होते की, वरच्या अंगरख्याकडे तर आपली दृष्टी जाते, परंतु या खाली काय आहे, याकडे आपली दृष्टी जातच नाही. म्हणून भगवान म्हणतात—"**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम्**" (गीता १८।५५) "मनुष्य मला तत्त्वाने जाणून मग तात्काल माझ्यात प्रविष्ट होतो" तत्त्वाने जाणणे म्हणजे काय? जसे सूती वस्त्रामध्ये कापसाची सत्ता असते, मातीच्या भांड्यांमध्ये मातीची सत्ता असते, लोखंडाच्या अस्त्र-शस्त्रांमध्ये लोखंडाची सत्ता असते, सोन्याच्या दागिन्यांमध्ये सोन्याची सत्ता असते, तसेच संसारामध्ये परमात्म्याची सत्ता आहे—हे जाणणेच तत्त्वाचे जाणणे अर्थात अनुभव करणे आहे.*

सोन्यापासून तयार केल्या जाणाऱ्या दागिन्यांचे अनेक प्रकार आहेत, एखादा गळ्यात घालण्याचा असतो, एखादा नाकात वापरावयाचा असतो, इत्यादी इत्यादी. त्या दागिन्यांच्या अनेक प्रकारच्या आकृती

* दागिन्यामध्ये सत्ता सोन्याची आहे, दागिन्याची नाही, म्हणून बनावटी दागिन्यापेक्षा (स्थूलदृष्टीने) सोन्याला सत्य म्हणत असतो. वास्तविक सोन्याचीही स्वतंत्र सत्ता नाही. संपूर्ण सृष्टीमध्ये एका परमात्मतत्त्वाचीच स्वतंत्र सत्ता आहे. त्या सत्य परमात्मतत्त्वाकडे लक्ष वेधण्यासाठीच रुई, माती, लोखंड, सोने इत्यादींना सत्य म्हटले गेले आहे.

असतात, अनेक प्रकारची नावे असतात, अनेक प्रकाचा उपयोग केला जातो, अनेक प्रकारचे वजन असते, अनेक प्रकारचे मूल्य असते. ते सर्व तर अनेक प्रकारचे आहेत, परंतु सोने अनेक प्रकारचे नाही. ज्यामध्ये कोणताही प्रकार नाही, जे एकच आहे, त्याला समजणे तत्त्वाने जाणणे आहे. त्याचप्रमाणे संसारामध्ये मनुष्य, पशू, पक्षी, वृक्ष, पर्वत, पाषाण, वीट, वाळू, चुना, माती इत्यादी तर अनेक प्रकार आहेत, परंतु त्यामध्ये जो राहणारा आहे, त्याचा कोणताही प्रकार नाही. ते प्रकाररहित तत्त्वच परमात्मा आहे.

दागिन्यामध्ये जसे परिवर्तन होते, तसे सोन्यामध्ये परिर्वन होत नाही. दागिने बदलले जातात परंतु सोने तेच राहते. त्याचप्रमाणे संसारामध्ये निरंतर परिवर्तन होत आहे, परंतु यामध्ये जे अपरिवर्तनशील परमात्मतत्त्व आहे, ते जसेच्या तसे राहते. भगवंतांनी म्हटले आहे—"**विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति**" (गीता १३/२७) अर्थात नष्ट होणाऱ्यामध्ये जे एक नष्ट न होणारे तत्त्व आहे, त्याला पाहणाराच वास्तविक योग्य पाहणारा आहे. जसे स्थूल दृष्टीने पाहिले तर वस्त्रे सर्व नष्ट होतात पण रुई राहते. भांडी सर्व नष्ट होतात पण माती राहते. अस्त्र, शस्त्र सर्व नष्ट होतात पण लोखंड राहते. दागिने सर्व नष्ट होतात पण सोने राहते. त्याचप्रमाणे सर्व संसार नष्ट होणारा आहे, परंतु परमात्मतत्त्व नष्ट होणारे नाही. त्या कधीही न बदलणाऱ्या आणि कधीही नष्ट न होणाऱ्या तत्त्वाकडेच पहावयाचे आहे, त्यालाच मानावयाचे आहे, त्यालाच महत्त्व द्यावयाचे आहे.

जसे आपण म्हणतो की "हा पदार्थ आहे" पण यामध्ये तर पदार्थ परिवर्तनशील संसार आहे आणि "आहे" अपरिवर्तनशील परमात्मतत्त्व आहे. संसारात देश, काल, क्रिया, वस्तू, व्यक्ती इत्यादी तर अनेक आहेत, परंतु त्या सर्वात "आहे" (सत्ता) रूपाने विद्यमान परमात्मतत्त्व एकच आहे. साधकाची दृष्टी निरंतर त्या "आहे" (परमात्मतत्त्व) याकडेच असली पाहिजे. जे "आहे" ते ठोस तत्त्व

आहे आणि सर्वांना नित्य-निरंतर प्राप्त आहे. संसार* कधीही कुणालाही प्राप्त झाला नाही, प्राप्त होणार नाही आणि प्राप्त होऊ शकत नाही. आपल्याकडून ही चूक होत असते की, आपण या शरीर संसाराला "**आहे**" (प्राप्त) मानत आहोत, जे वास्तविक नाही. शरीर पूर्वी नव्हते—हा सर्वांचा अनुभव आहे, पुढे हे शरीर राहणार नाही—हाही सर्वांचा अनुभव आहे आणि शरीर प्रत्येक क्षणाला नष्ट होत आहे—हाही सर्वांचा अनुभव आहे. या अनुभवालाच महत्त्व द्यावयाचे आहे.

जर भक्तीच्या दृष्टीने पाहिले तर सर्वरूपाने एक परमात्माच आपल्यासमोर येतात. आपणाला जेव्हा भूक लागते तेव्हा अन्नरूपाने तेच पुढे येतात, आपणाला जेव्हा तहान लागते, तेव्हा पाणीरूपाने तेच पुढे येतात, आपण जेव्हा आजारी पडतो तेव्हा तेच औषधरूपाने येतात, आपण जेव्हा भोगी होतो, तेव्हा भोग्यरूपाने तेच पुढे येतात, आपणाला जेव्हा उष्णता जाणवते, तेव्हा छायारूपाने तेच येतात, आपणाला जेव्हा थंडीची जाणीव होते तेव्हा वस्त्ररूपाने तेच येतात. तात्पर्य हे आहे की, सर्वरूपाने आपणाला परमात्माच प्राप्त होतात. परंतु आपण त्या रूपात आलेल्या परमात्म्याचा जेव्हा भोग करू लागतो, तेव्हा परमात्मा दुःखरूपाने, नरकरूपाने येतात.

**प्रश्न**—परमात्मा अन्न, पाणी इत्यादी नाशवान वस्तूंच्या रूपात का येतात?

**उत्तर**—आपण आपल्याला शरीर मानून आपल्यासाठी वस्तूंची आवश्यकता मानतो आणि त्यांची इच्छा करतो तर परमात्मासुद्धा

---

* समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम्।
विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति॥
(गीता १३/२७)

"जो नष्ट होत असलेल्या संपूर्ण प्राण्यांमध्ये परमात्म्याला नाशरहित आणि समरूपाने स्थित पाहतो, तोच वास्तविक योग्य रीतीने पाहतो."

तसेच बनून आपल्यासमोर येतात. आपण असतमध्ये स्थित होऊन पाहू लागलो तर परमात्मासुद्धा असतरूपानेच दिसतात. आपण परमात्म्याला जसे पाहू इच्छितो, ते तसेच दिसतात—"**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्**" (गीता ४/११) जसे बालक खेळणी मागताच, माता रुपये खर्च करून बालकास खेळणी आणून देते. त्याचप्रमाणे आपण जे इच्छितो, परम दयाळू परमात्मा त्याच रूपात आपल्यापुढे येतात. जर आपण भोग इच्छिले नाही तर भगवंतांना भोगरूपाने कशाला यावे लागेल? बनावटी रूप कशासाठी धारण करावे लागेल?



# २. प्राप्त तत्त्वाचा अनुभव

एक दिसणारी वस्तू आहे आणि एक न दिसणारी वस्तू आहे. दिसणारी वस्तू ''प्रतीती'' आहे[१] आणि न दिसणारी वस्तू ''प्राप्त'' आहे. प्रतीतीला जड (प्रकृती) म्हणतात, ज्याचे असतरूपाने वर्णन केले जाते आणि प्राप्ताला चेतन (पुरुष) म्हटले जाते, ज्याचे सतरूपाने वर्णन केले जाते—''**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि**'' (गीता १३/१९). प्रतीतीची तर स्वतंत्र सत्ता नसते आणि प्राप्ताचीच सत्ता असते—''**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः**'' (गीता २/१६).

जड आणि चेतन—दोन्ही परस्पर विरोधी स्वभावाचे आहेत. जड तर नित्य-निरंतर बदलत राहते, एक क्षणसुद्धा स्थिर राहत नाही आणि चेतन नित्य-निरंतर जसेच्या तसे राहते, कधी एक क्षणसुद्धा बदलत नाही. जसे रात्र आणि दिवस यांचा परस्पर कधीही संयोग होऊ शकत नाही, तसेच जड आणि चेतनाचाही कधी परस्पर संयोग होऊ शकत नाही. परंतु गीतेमध्ये आले आहे की, संपूर्ण प्राणी जड चेतनाच्या संयोगाने उत्पन्न होतात. याचे तात्पर्य हे आहे की, चेतनच जडाशी आपला संयोग मानतो अर्थात[२] जड-चेतनाचा संयोग केवळ चेतनाची मान्यता आहे, वास्तविक नाहीच—''**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत्**'' (गीता ७/५), ''**मनः षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि**

---

१-प्रतीतीचे दोन भेद आहेत—प्रतीती आणि भान. प्रतीती इद्रियांचा विषय आहे आणि भान अंत:करणाचा विषय आहे. प्रतीती स्थूल आहे आणि भान सूक्ष्म आहे. सांसारिक पदार्थ, व्यक्ती इत्यादींची प्रतीती होते आणि इंद्रियांचे, अहम्‌चे भान होते. तात्पर्य हे आहे की, प्रतीती आणि अनुभव या दोन्हींच्या मध्यभागी भान आहे. भानाचा ज्ञाता स्व (आत्मा) आहे.

२-यावत्सञ्जायते किञ्चित्सत्त्वं स्थावरजङ्गमम्।
क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ॥
(गीता १३/२६)

**कर्षति**'' (गीता १५/७). या मानलेल्या संबंधाला सोडण्याची जबाबदारीसुद्धा चेतनावरच आहे, कारण यानेच जडाला पकडले आहे.

जेव्हा चेतन जडाशी आपला संबंध जोडतो, तेव्हा तादात्म्यरूप अहम् उत्पन्न होतो. हा अहम् केवळ चेतनातही नसतो किंवा केवळ जडातही नसतो, तर जड-चेतनाच्या मानलेल्या संयोग (चिज्जडग्रन्थी) यामध्ये असतो. हा अहमच संसार बंधनाला मूळ कारण आहे. या अहम-पासूनच ममता, कामना इत्यादी अनेक दोषांची उत्पत्ती होते. म्हणून या अहमला नष्ट करण्यासाठी साधकाने संसाराच्या दृष्टीने असे मानावे की ''संसाराची स्वतंत्र सत्ता नाही'' अथवा परमात्माच्या दृष्टीने असे मानावे की ''सर्व काही परमात्माच आहे.''*

श्रीमद्भागवतामध्ये भगवंतांनी संसाराच्या दृष्टीने म्हटले आहे—

**किं भद्रं किमभद्रं वा द्वैतस्यावस्तुनः कियत्।**
**वाचोदितं तदनृतं मनसा ध्यातमेव च॥**

(११/२८/४)

''संसाराच्या सर्व वस्तू वाणीने उच्चारल्या जाऊ शकतात आणि मनाने विचारात आणल्या जाऊ शकतात, म्हणून त्या सर्व असत्य आहेत. जर द्वैत नावाची कोणती वस्तूच नाही, तर मग त्यामध्ये काय चांगले आणि काय वाईट?''

परमात्म्याच्या दृष्टीने म्हटले आहे—

**मनसा वचसा दृष्ट्या गृह्यतेऽन्यैरपीन्द्रियैः।**
**अहमेव न मत्तोऽन्यदिति बुध्यध्वमञ्जसा॥**

(११/१३/२४)

---

* ज्ञानाची रुची असणारा साधक असे मानतो की ''हे सर्व नाही'' आणि भक्तीची रुची असणारा साधक ''सर्व काही परमात्माच आहे'' असे मानतो रुचीमध्ये फरक असला तरीही परिणामी दोन्ही एकच होतात अर्थात दोघांचा हा अनुभव होतो की, एक परमात्मतत्त्वाशिवाय दुसरे काहीही नाही.

"मनाने, वाणीने, दृष्टीने तसेच अन्य इन्द्रियांनी[१] जे काही ग्रहण केले जाते, ते सर्व मीच आहे. म्हणून माझ्याशिवाय दुसरे काहीही नाही—हा सिद्धान्त तुम्ही विचारपूर्वक शीघ्र समजून घ्या अर्थात स्वीकार करा."

ग्रहण त्याचेच केले जाते ज्याची सत्ता असते. संसाराची स्वतंत्र सत्ता-च नाही, तो एक क्षणसुद्धा स्थिर राहत नाही, तर मग तो कसा ग्रहण केला जाऊ शकतो? चेतनाकडून चेतनाचेच ग्रहण होत असते. स्व (आत्मा) चेतन आहे म्हणून तो चेतन परमात्मतत्त्वालाच ग्रहण करतो, जडाला नाही. परंतु जेव्हा स्व जडाशी आपला संबंध मानतो, तेव्हा तो जड शरीर-इंद्रिये-मन-बुद्धीद्वारा जडतेलाच ग्रहण करतो. जडतेला ग्रहण केल्याने तो चिन्मय-तत्त्वापासून (परमात्मापासून) विमुख होतो आणि त्यामध्ये जडतेची (शरीराची) मुख्यता राहते. जडतेच्या मुख्यतेला नष्ट करण्यासाठी साधकाने "हे सर्व नाही" या वास्तविकतेला दृढतेने मान्य करावे.[२] असे मानल्याने त्याचा जडतेशी संबंध-विच्छेद होईल आणि "सर्व काही परमात्माच आहे"—हे अनुभवाला येईल. तात्पर्य हे आहे की, त्याच्याकडून जडतेचे ग्रहण होणार नाही, तर परमात्म्याचेच[३] ग्रहण होईल.

जसे, मनुष्याची दृष्टी जेव्हा दागिन्याकडे, त्याच्या नाव, रूप, आकृती, वजन, मूल्य तसेच उपयोगाकडे राहते, तेव्हा त्याच्या दृष्टीत सोन्याची मुख्यता राहत नाही. तसेच मनुष्याची दृष्टी संसाराकडे राहते, तेव्हा त्याची दृष्टी परमात्म्याकडे जात नाही. जर त्याने दृढतेने असे मानले की "हे सर्व नाही" तर त्याच्या दृष्टीमध्ये संसाराच्या स्वतंत्र

---

१-येथे "मनसा" म्हणजे अंत:करण, "वचसा" म्हणजे सर्व कर्मेंद्रिये आणि "दृष्ट्या" म्हणजे सर्व ज्ञानेंद्रिये समजावीत.

२-देखिअ सुनिअ गुनिअ मन माहीं। मोह मूल परमारथु नाहीं॥ (मानस० २/९२/४)

३-जड़ चेतन जग जीव जत सकल राममय जानि। (मानस० १/७)

सत्तेचा अभाव होऊन जाईल आणि "सर्व काही परमात्माच आहे" हे अनुभवामध्ये येईल. तात्पर्य हे आहे की, त्याच्या दृष्टीत संसार राहणार नाही, तर परमात्माच राहील—"**वासुदेवः सर्वम्**" (गीता ७/१९), जे वास्तविक आहे.

जसे सोन्याला जाणणारा मनुष्य सोने आणि दागिने—दोन्हींना जाणतो, तसेच परमात्मतत्त्वाला जाणणारा तत्त्वज्ञ महापुरूष सत्तायुक्त परमात्म्यालाही (प्राप्तालाही) जाणतो आणि सत्तारहित संसारालाही (प्रतीतीलाही) जाणतो—

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः।**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः॥**

(गीता २/१६)

"असतचा तर भाव (सत्ता) विद्यमान नाही आणि सतचा अभाव विद्यमान नाही. तत्त्वदर्शी महापुरुषांनी या दोन्हींचाही अंत अर्थात तत्त्व पाहिले आहे."

असतचे (प्रतीतीचे) दोन विभाग आहेत. शरीर तथा संसार. शरीराला संसाराच्या सेवेत समर्पित करणे "कर्मयोग" आहे आणि संसारापासून सुख इच्छिणे "जन्ममरणयोग" आहे. सतचेही (प्राप्ताचेही) दोन विभाग आहेत—आत्मा तथा परमात्मा. आत्म्याचे आपले आपल्यात स्थित होणे "ज्ञानयोग" आहे आणि आपण आपल्याला परमात्म्याला समर्पित करणे "भक्तियोग" आहे. कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तीयोग—तिन्ही पैकी कोणताही एक पूर्ण झाल्यास मानलेल्या अहमचा नाश होतो.

प्रतीती करण-सापेक्ष आहे आणि जे प्रतीतीहून अतीत परमात्मतत्त्व (प्राप्त) आहे, ते करण-निरपेक्ष आहे. म्हणून परमात्मतत्त्वाचा अनुभव अभ्याससाध्य नाही अर्थात त्याच्या अनुभवासाठी शरीर-इंद्रिये-मन-बुद्धी इत्यादी करणांची थोडीहीसुद्धा अपेक्षा (आवश्यकता) नाही. यांची आवश्यकता केवळ संसारासाठी आहे, आपल्यासाठी नाही.

अभ्यासाने केवळ अवस्थेचे परिवर्तन तसेच एक नवीन अवस्था निर्माण होते. अवस्थातीत तत्त्वाचा अनुभव अभ्यासाने होत नाही, तर अनभ्यासाने होतो. अनभ्यासाचा अर्थ आहे—काहीही न करणे. संपूर्ण करणे प्रकृतीच्या संबंधानेच असते. प्रकृतीच्या संबंधाशिवाय चेतन काहीही करूच शकत नाही, करणे होतच नाही. म्हणून त्याच्यावर करण्याची जबाबदारीही नाही. चेतनामध्ये कर्तृत्व नाहीच, तर मग त्याच्याकडून क्रिया कशी होईल? जर लेखकच नसेल, तर मग लेखन-क्रिया कशी होईल? चेतन अहंकाराने मोहित होऊन केवळ आपल्यामध्ये कर्तृत्वाची मान्यता करू शकतो—"**अहङ्कारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते**" (गीता ३/२७). वास्तविक पाहिले तर तो कर्ताही नाही आणि भोक्ताही नाही—"**न करोति न लिप्यते**" (गीता १३/३१). म्हणून तत्त्वाचा अनुभव करण्यासाठी क्रिया आणि पदार्थ यांना महत्त्व देणे महान अज्ञान आहे. क्रिया आणि पदार्थांचा उपयोग संसाराच्या हितासाठी आहे. आपल्या हितासाठी तर यापासून सर्वथा असंग, उपराम व्हावयाचे आहे.

तत्त्वाचा अनुभव प्रतीतीद्वारा होत नाही, तर प्रतीतीच्या त्यागाने (संबंध-विच्छेदाने) होतो. कारण प्रतीतीचा आश्रयच बंधास कारण आहे—"**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु**" (गीता १३/३१). प्रतीतीचा आश्रय, साहाय्यता घेतल्याविना अभ्यास होत नाही. ज्याचा आश्रय घेतला जाईल, त्याचा त्याग कसा होईल? त्याचे तर महत्त्वच वाढेल. म्हणून तत्त्वाला अभ्याससाध्य मानल्याने एक फार मोठी हानी ही होते की, ज्याच्यापासून बंधन होते, त्यालाच मनुष्य तत्त्वप्राप्तीमध्ये सहायक मानतो आणि त्याच्या महत्तेचा आणि आवश्यकतेचा अनुभव करतो. म्हणून अभ्यासाने बंधन अथवा प्रतीतीची पराधीनता जशीच्या तशी सुरक्षित राहते, त्यामुळे प्रतीतीचा त्याग करणे फार कठीण होते. जसे बेडी मग ती लोखंडाची असो अथवा सोन्याची, बंधनात कोणताच फरक पडत नाही. फरक पडत असेल, तर केवळ

एवढाच पडतो की, लेखंडाच्या बेडीचा त्याग करणे तर सोपे जाते, परंतु सोन्याच्या बेडीचा त्याग करणे फार कठीण जाते, कारण अंत:करणात सोन्याचे महत्त्व आहे.

स्व पुढे (स्वरूपापुढे) एक तर प्रतीती (संसार) आहे आणि एक प्राप्त (परमात्मा) आहे. प्रतीतीला सम्मुख होणे बंधन आहे आणि प्राप्ताच्या सम्मुख होणे मुक्ती आहे. वास्तविकरीतीने पाहिले तर मुक्तीचा अभाव कधी झाला नाही, आत्ता नाही, होणार नाही आणि होऊ शकत नाही. प्राप्ताची सत्ता न मानता प्रतीतीची सत्ता मानणेच बंधन आहे आणि प्रतीतीची सत्ता न मानता प्राप्ताच्या सत्तेचा अनुभव करणेच मुक्ती आहे. म्हणून बंधन आणि मोक्ष केवळ मान्यतेमध्ये आहेत, स्वरूपात नाही.

**प्रश्न**—जे प्राप्त आहे, ते परमात्मतत्त्व दिसत नाही आणि जे प्रतीती आहे तो संसार दिसतो—याचे काय कारण आहे?

**उत्तर**—जसे शरीराचा मुख्य आधार हाडे आहेत, परंतु ते दिसत नाहीत. जे मुख्य आधार नाही, ते कातडे दिसते. ज्यामध्ये शक्ती आहे ती वस्तू दिसत नाही आणि जी वस्तू दिसते तिच्यात शक्ती नाही. तसेच परमात्मा संसाराचे मुख्य आधार आहेत, परंतु ते दिसत नाहीत, तर संसार दिसतो. जे वास्तविक आहे, ते दिसत नाही आणि जे दिसते ते वास्तविक नाही.

जसे हाड पित्याच्या अंशाने आणि कातडे मातेच्या अंशाने उत्पन्न होते.* म्हणून शरीर माता-पित्याचा अंश आहे. परंतु शरीरामध्ये

---

* अस्थि स्नायुश्च मज्जा च जानीमः पितृतो गुणाः।
त्वङ्मांसं शोणितं चेति मातृजान्यपि शुश्रुम॥
(महा० शांती० ३०५।५६)

"हाड, स्नायु आणि मज्जा—यांना मी पित्यापासून प्राप्त झालेले गुण समजतो तसेच त्वचा मांस आणि रक्त—हे मातेपासून प्राप्त झालेले गुण आहेत, असे मी ऐकले आहे."

माता-ही दिसत नाही किंवा पिताही दिसत नाही. तसेच संसार प्रकृती आणि परमात्मा यांच्या संयोगाने उत्पन्न होतो.* परंतु संसारामध्ये प्रकृतीही दिसत नाही किंवा परमात्माही दिसत नाहीत, तर केवळ प्रकृतीचे कार्य दिसते.

शरीरातील मानेच्या वरच्या भागाला "उत्तमांग" म्हणतात, कारण श्रोत्र, त्वचा, नेत्र, रसना आणि घ्राण—ही पाचही ज्ञानेन्द्रिये त्यात स्थित आहेत. उत्तमांगातही "मुख" प्रधान आहे, कारण रसना (ज्ञानेन्द्रिय) आणि वाणी (कर्मेंद्रिय) ही दोन इंद्रिये मुखात स्थित आहेत. शरीराच्या दुसऱ्या कोणात्याही अंगामध्ये दोन इंद्रिये एका ठिकाणी नाहीत. मुखामध्ये हाडेसुद्धा दातरूपाने दिसत असतात. त्याचप्रमाणे संसारामध्ये जीवन्मुक्त, तत्त्वज्ञ महापुरूषांनासुद्धा मुखासमान मानले पाहिजे. मुख सहसा बंद असते परंतु विशेष प्रसन्नता प्राप्त झाली असता मुख उघडले जाते आणि त्यामध्ये दात दिसू लागतात. तसेच जिज्ञासू समोर आला असता ते महापुरुष विशेष प्रसन्न होतात, त्यावेळी परमात्मतत्त्वाचा बोध प्रकट होतो—

**"ब्रूयुः स्निग्धस्य शिष्यस्य गुरवो गुह्यमप्युत।"**

(श्रीमद्भा० १/१/८, १०/१३/३)

**गूढ़उ तत्त्व न साधु दुरावहिं। आरत अधिकारी जहँ पावहिं॥**

(मानस० १/११०/१)

जसे वासरू समोर आले असता गायीच्या स्तनामध्ये दूध येते, तसेच जिज्ञासू समोर आला तर त्या महापुरुषाच्या कृपेचा वर्षाव होतो. त्यावेळी जिज्ञासु आपल्या जिज्ञासेनुसार जेवढे ज्ञान घेऊ शकतो, तेवढे घेतो.

---

* मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम्।
सम्भवः सर्वभूतानां ततो भवति भारत॥
सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः सम्भवन्ति याः।
तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता॥
(गीता १४/३-४)

# ३. सर्वांच्या अनुभवाची गोष्ट

कोणत्याही एखाद्या वस्तूच्या प्राप्तीसाठी एक ''निर्मिती'' असते आणि एक ''अन्वेषण'' असते. सांसारिक वस्तूंचे निर्माण असते आणि परमात्मतत्त्वाचे अन्वेषण असते. कारण निर्मिती तर त्या वस्तूची होत असते, जे आता विद्यमान नसते, परंतु अन्वेषण त्या वस्तुचे होत असते जी पूर्वीपासूनच विद्यमान आहे. नवीन वस्तू निर्माण करण्यासाठी विलंब लागतो आणि अभ्यास, प्रयत्न करावा लागतो. परंतु जी वस्तू पूर्वीपासूनच विद्यमान आहे, त्याची प्राप्ती तात्काल होते, कारण ती स्वतः सिद्ध आहे. म्हणून ती प्राप्त करण्यासाठी अभ्यास करण्याची आवश्यकता नाही, केवळ त्याकडे दृष्टी वळविण्याची आवश्यकता आहे. तिकडे दृष्टी गेली की ती प्राप्त होते.

गीतेमध्ये आले आहे—

**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।**
**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ॥**

(१३/३१)

''अनादी आणि निर्गुण असल्याने हे अविनाशी आत्मतत्त्व शरीरामध्ये राहत असूनही काही करतही नाही आणि लिप्तही होत नाही.'' तात्पर्य हे आहे की, याला कर्तृत्व आणि भोक्तृत्व (लिप्तता) याचा अभाव करावा लागत नाही, तर याचे ठिकाणी अकतृत्व आणि निर्लिप्तता स्वत:सिद्ध आहे. स्वत:ला शरीरामध्ये स्थित मानीत असला तरीही हा कर्ता आणि भोक्ता बनत नाही. ज्यावेळी हा स्तव:ला शरीरामध्ये स्थित पाहतो तसेच मानतो, त्यावेळीही हा वास्तविक शरीरामध्ये स्थित नसतो. कारण जसे सूर्याचा अमावस्येशी संयोग होऊ शकत नाही, तसेच चेतन तत्त्वाचा जड शरीराशी संयोग होऊ शकत नाही. म्हणून जडाशी संयोग (शरीरामध्ये स्थिती) ही केवळ चेतनाची मान्यता आहे. मान्यतेशिवाय

दुसरे कहीही नाही. स्वतःच्या ठिकाणी कर्तृत्व आणि भोक्तृत्व याची केवळ मान्यता आहे. मान्यता नाहीशी झाली की प्राप्ती झालीच. मान्यता नाहीशी करण्यासाठी क्रियेची (करणे) जरूरी नाही, तर भाव (मानणे) आणि बोध (जाणणे) जरूरी आहे.

क्रिया करण्याने जो अनुभव होईल, तो तत्त्वाचा अनुभव होणार नाही, कारण क्रिया केल्याने उत्पन्न झालेल्या वस्तूशीच संयोग होतो, अनुत्पन्न तत्त्वाचा अनुभव येत नाही. अनुत्पन्न तत्त्वाचा अनुभव क्रियेशी असंग झाल्योनेच होईल क्रियेने अर्थात अभ्यासाने तत्त्वज्ञान होत नाही, तर एक नवीन अवस्था तयार होते. जसे दोरीवर चालावयाचे असेल तर अभ्यास करावा लागेल, तेव्हा चालू शकाल, नाहीतर पडाल. दुसरी गोष्ट, अभ्यास कराल तर पूर्वीचा अभ्यास रद्द करूनच कराल, योदर्शनात आले आहे—"**तत्र स्थितौ यत्नोऽभ्यासः**" (१।१३), "कोणत्याही एका विषयामध्ये स्थिरता प्राप्त करण्यासाठी वारंवार प्रयत्न करण्याचे नाव अभ्यास आहे." म्हणून जर प्रयत्न कराल, तर पूर्वीचा प्रयत्न रद्द करावा लागेल तरच दुसरा प्रयत्न कराल, दुसरा प्रयत्न रद्द कराल तेव्हाच तिसरा प्रयत्न कराल. तात्पर्य हे आहे की, जेव्हा आपण आपल्या ज्ञानाला रद्द करतो, तेव्हाच अभ्यासाची जरूरी भासते, नाहीतर अभ्यासाची काय आवश्यकता आहे?

असा सर्वांचा अनुभव आहे की, असे कोणतेही वर्ष, महीना, दिवस, तास, मिनिट आणि सेकंद नाही, ज्यामध्ये शरीराचे परिवर्तन अथवा वियोग होत नाही. परंतु चेतन तत्त्वाचा कधीही कोणत्याही वर्ष, महीना, दिवस, तास, मिनिट, आणि सेकंद यामध्ये परिवर्तन अथवा वियोग होत नाही अर्थात त्याचा नित्ययोग आहे. जसे—आज तर मी असा आहे, परंतु बाळपणी मी असा होतो, अशा प्रकारे शिकत होतो—असे केवळ म्हटल्यानेच हे सिद्ध होते की, शरीर क्रिया, परिस्थिती इत्यादी बदलले आहेत, मी बदललो नाही, मी तोच आहे. शरीर इत्यादीच्या परिवर्तनाचा अनुभव सर्वांना आहे, परंतु स्व च्या परिवर्तनाचा

अनुभव कोणालाही नाही. जीव आपल्या कर्माचे फल भोगण्यासाठी चौऱ्यांशी लाख योनीत जातो, नरक आणि स्वर्गात जातो—असे केवळ म्हटल्यानेच हे सिद्ध होते की, चौऱ्यांशी लाख योनी सुटत राहतात, नरक आणि स्वर्ग सुटतो, परंतु स्व तोच राहतो. योनी शरीर बदलतात, जीव बदलत नाही, जीव एक राहतो, म्हणूनच तर तो अनेक योनी, अनेक लोकात, जातो. भगवंतांनीसुद्धा अनित्य पदार्थ आणि क्रिया याकडील दृष्टी हटवून नित्य तत्त्वाकडे दृष्टी वळविण्यास सांगितले आहे—

**न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः।**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम्॥**

(गीता २।१२)

"कोणत्याही काळामध्ये मी नव्हतो—असे नाही अर्थात मी अवश्य होतो, तू नव्हतास—असेही नाही अर्थात तूही अवश्य होतास. तसेच हे राजलोक नव्हते—असेही नाही अर्थात हे राजेलोकही अवश्य होते आणि यानंतर. मी, तू तसेच हे राजेलोक राहणार नाहीत असेही नाही अर्थात मी, तू तसेच हे राजेलोक नित्य राहतीलच," तात्पर्य हे आहे की, मी कृष्णरूपाने, तू अर्जुनरूपाने तसेच हे राजेरूपाने पूर्वीही नव्हते आणि पुढेही राहणार नाहीत, परंतु सत्तारूपाने आपण सर्व (जीवमात्र) पूर्वीही होतो आणि पुढेही राहू. शरीराच्या दृष्टीने मी, तू तसेच हे राजेलोक—तीन आहेत परंतु सत्तेच्या दृष्टीकोनातून एकच आहेत—ही दृष्टी आत्मतत्त्वाकडे आहे, शरीराकडे नाही.

**वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही॥**

(गीता २।२२)

"मनुष्य जसे जीर्ण वस्त्रांचा त्याग करून दुसरी नवी वस्त्रे धारण करतो, तसेच देही (जीवात्मा) पूर्वीचे शरीर सोडून दुसऱ्या नवीन शरीरात प्रवष्टि होतो." जीर्ण वस्त्राचा त्याग केल्याने मनुष्य

मरत नाही आणि दुसरे नवे वस्त्र परिधान केल्याने त्याचा जन्म होत नाही. तात्पर्य हे आहे की, मरणे अणि जन्मणे शरीराचे होत असते, स्व चे नाही.

जो अनेक योनीत अनेक सुख दुःख भोगतो, तो स्व कोणाशीही लिप्त नाही, कुठेही फसत नाही. जर तो लिप्त झाला नसता, फसला नसता तर मग चौऱ्यांशी लाख योनी कोण भोगल्या असत्या? हा सर्वांचा प्रत्यक्ष अनुभव आहे की, आपण सदा जागृतीतही राहत नाही, सदा स्वप्नातही राहत नाही, सदा सुषुप्तीतही राहत नाही, सदा मूर्च्छेतही राहत नाही आणि सदा समाधीतही आपण राहत नाही. तात्पर्य स्व या सर्व अवस्थांपासून वेगळा आणि यांना जाणणारा आहे. जो संपूर्ण अवस्था, संपूर्ण परिस्थिती, संपूर्ण क्रिया, तसेच संपूर्ण पदार्थ यांच्या संयोग-वियोगाला जाणणरा आहे, तो स्व एकच असतो. जर तो एखाद्या अवस्थेत लिप्त झाला तर तो दुसऱ्या अवस्थेमध्ये कसा जाईल? आणि त्यापासून स्वतःचा वेगळा अनुभव कसा करील? परंतु तो दुसऱ्या अवस्थेत जातो आणि तो आपणाला त्यापासून वेगळा अनुभवितो. म्हणून या सर्व अवस्था, परिस्थिती, क्रिया, पदार्थ, यापासून मी वेगळा आहे—या आपल्या अनुभवाचाच आदर करावयाचा आहे, त्यालाच महत्त्व द्यावयाचे आहे, त्याचाच स्वीकार करावयाचा आहे. हे शिकावे लागत नाही. शिकल्याने लाभ होणार नाही, उलट अभिमान उत्पन्न होईल. या अवस्था इत्यादीपासून स्वतःला वेगळे अनुभवण्याचे नावच "ज्ञान" आहे आणि त्यांच्याशी एक होण्याचे नावच "अज्ञान" आहे.

स्व च्या ठिकाणी कर्तृत्व आणि लिप्तता नाही. ही प्रत्यक्ष अनुभवाची गोष्ट आहे की, मनुष्य कधी काही करतो तर कधी काही करतो, कधी कशामध्ये लिप्त होतो. कर्तृत्व आणि लिप्तता कधी कशामध्ये निरंतर राहत नाही, तर बदलत राहतात. मनुष्य जे काही करतो त्याची समाप्ती होतच असते. तो ज्या ज्यामध्ये लिप्त होतो,

त्याचा वियोग (उपरती) होतोच. भोजनामध्ये सुरवातीला फारच लिप्तता, रुची राहत असते. परंतु जस-जसे भोजन करतो, तस-तसे ती रुची कमी होत जाते आणि शेवटी त्याविषयी अरुची होते. अशाप्रकारे कर्तृत्व आणि लिप्तता निरंतर राहत नाही, परंतु स्व निरंतर राहतो. स्व च्या ठिकाणी अकर्तृत्व आणि निर्लिप्तता स्वत:सिद्ध आहे. मनुष्य कर्ता होतो तेव्हाही स्व रहतो, कर्ता राहत नाही तेव्हाही स्व राहतो, लिप्त झाला तरीही स्व राहतो, लिप्त झाला नाही तरीही स्व राहतो, आपण कधी बसतो, कधी झोपतो, कधी कोठे जातो, कधी कोणाची भेट घेतो, तर ह्या सर्व क्रिया वेगवेगळ्या झाल्या, परंतु आपण एकच राहिलो. म्हणून स्व तोच राहतो—ही गोष्ट आपल्या विवेकानेच सिद्ध आहे. यामध्ये क्रियेची काय आवश्यकता आहे?

तात्पर्य हे आहे की, तत्त्व स्वत: स्वाभाविक आहे. त्याच्या प्राप्तीत कोणतीही क्रिया नाही, कोणतेही परिश्रम नाहीत. ते तत्त्व संपूर्ण देश, काल, क्रिया, वस्तू, व्यक्ती, अवस्था, घटना, परिस्थिती इत्यादीत "**आहे**" रूपाने (सत्तारूपाने) विद्यमान आहे. घटना, देश, काल इत्यादी पर नाहीत परंतु तत्त्व आहे. देश, काल इत्यादी तर विकारी आहेत, परंतु तत्त्व निर्विकाररूपाने जसेच्या तसे राहते. जेव्हा साधक स्वत:ला विसरतो अर्थात त्याचे ठिकाणी मीपणा, परिच्छिन्नता, व्यक्तीत्व राहत नाही, तेव्हा ते तत्त्व राहते अर्थात अनुभवात येते.

तत्त्व अनादी-अनंत आणि स्वत: सिद्ध आहे. ते जसे आहे, तसेच त्याला जाणावयाचे आहे आणि त्याला जाणल्यावर ते जसे होते, तसेच ते राहते. तात्पर्य ज्ञान (बोध) झाल्यावर असा अनुभव येत नाही की, इतके दिवस मी अज्ञानी होतो, आता ज्ञानी झालेला आहे अथवा माझे अज्ञान नाहीसे झाले आणि मला ज्ञान झाले.

संसाराची निवृत्ती आणि परमात्म्याची प्राप्ती स्वाभाविक आहे. नित्य निवृत्ताचीच निवृत्ती होत असते आणि नित्य प्राप्ताचीच प्राप्ती होते. वास्तविक पाहिले तर निवृत्तीही नाही आणि प्राप्तीही नाही.

म्हणून तत्त्वज्ञान झाल्यावर निवृत्तीही होत नाही आणि प्राप्तीही होत नाही, तर निवृत्ती-प्राप्तीची दृष्टी (मान्यता) नाहीशी होते आणि तत्त्व आहे ते राहते.* अशाप्रकारे वास्तविक ज्ञानही नाही आणि अज्ञानही नाही. आजपर्यंत कधी कोणी ज्ञानी झाला नाही, आत्ता नाही, होणार नाही, होऊ शकत नाही. कारण ज्ञानामध्ये व्यक्तित्व नाही. म्हूणन ज्ञान आणि ज्ञानी, अज्ञान आणि अज्ञानी—या दोन्ही गोष्टी अज्ञानियांच्या दृष्टीतच आहेत. म्हणून साधक झालेला आहे आणि सिद्ध स्वत:सिद्ध आहे.

**प्रश्न**—परमात्मतत्त्व इतके सोपे आहे की, त्याकडे केवळ दृष्टी वळविल्याने त्याची प्राप्ती होते, तर मग यामध्ये कशामुळे बाधा येत आहे. ?

**उत्तर**—ज्या रीतीने सांसारिक वस्तूंची प्राप्ती होते, त्याच रीतीने परमात्म्याचीही प्राप्ती होते—ही मान्यता परमात्मप्राप्तीमध्ये फार बाधक आहे. सांसारिक वस्तूंची प्राप्ती तर कर्मापासून होते, परंतु परमात्मप्राप्ती कर्माद्वारा होत नाही, तर भाव आणि बोधद्वारा होत असते. कारण सांसारिक वस्तुंना बनवावे लागते, उत्पन्न करावे लागते, कोठून तरी आणावे लागते, त्यासाठी कुठे तरी जावे लागते, परंतु परमात्म्याला बनवावे लागत नाही, उत्पन्न करावे लागत नाही, कोठून आणावे लागत नाही, त्याच्यासाठी कुठे जावे लागत नाही. परमात्मा संपूर्ण देश, काल, वस्तू, व्यक्ती, परिस्थिती, घटना, अवस्था इत्यादीमध्ये जसाच्या तसा विद्यमान आहे. त्याच्या प्राप्तीची तीव्र उत्कंठा नाही म्हणून त्याची प्राप्ती होत नाही. उत्कंठा न होण्याचे कारण शरीराशी एकता मानून सुख भोगणे हे आहे. जसे जाळ्यात अडकलेला मासा पुढे जाऊ शकत नाही, तसेच सांसारिक सुखात फसलेल्या माणसाची दृष्टी परमात्म्याकडे अग्रेसर होऊच शकत नाही. एवढेच

* खोया कहे सो बावरा, पाया कहे सो कूर।
पाया खोया कुछ नहीं, ज्यों-का-त्यों भरपूर॥

नव्हे, सांसारिक सुखामध्ये (भोग आणि संग्रह) आसक्त झालेला मनुष्य परमात्म्याच्या प्राप्तीचा निश्चयसुद्धा करू शकत नाही.*

सुख भोगणे म्हणजे आपल्या विवेकाचा अनादर करणे आहे. जर मनुष्याने आपल्या विवेकाला महत्त्व दिले तर तो सुख भोगू शकणार नाही. कारण भोग्य वस्तूला स्थायी मानूनच सुखभोग होतो. त्याला स्थायी मानल्याशिवाय सुखभोग होऊच शकत नाही. शरीर–संसार प्रत्येक क्षणाला बदलताहेत, एकक्षण सुद्धा स्थिर राहत नाहीत—असा विवेक झाल्यास मनुष्य सुख भोगूच शकत नाही. कारण विवेक जागृत झाल्यास मनुष्याची स्थिती शरीरात राहत नाही, तर स्वरूपात राहते, म्हणून मनुष्याने आपल्या विवेकाला महत्त्व दिले पाहिजे. जर मनुष्याने आपल्या विवेकाला महत्त्व दिले नाही तर मग काय वृक्ष महत्त्व देतील? काय पशू महत्त्व देतील? मनुष्य आणि पशूत काय फरक राहिला?

संसारात कोणतीही वस्तू स्थिर नाही, प्रत्येक वस्तू प्रत्येक क्षणाला नाशाकडे धावत आहे—ही गोष्ट शिकावयाची नाही, तर समजून घ्यावयाची आहे, अनुभवायची आहे, अनुभव झाल्यावर सुखासक्ती राहणार नाही.



* भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम्।
व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते॥

(गीता २। ४४)

"त्या पुष्पित (भोग आणि ऐश्वर्याच्या प्राप्तीचे वर्णन करणाऱ्या) वाणीने ज्यांचे अंत:करण भोगाकडे ओढले गेले आहे आणि जे भोग आणि ऐश्वर्यात अत्यंत आसक्त आहेत, त्या मनुष्यांची परमात्म्याच्या ठिकाणी निश्चयात्मिका बुद्धी होत नाही."

# ४. अहंकार तसेच त्याची निवृत्ती

जीवाच्या बंधनाचे मूळ कारण अहंकार आहे. अहंकार दोन प्रकारचा असतो—

(१) अपरा (जड) प्रकृतीचा धातूरूप अहंकार (गीता ७।४, १३।५) याला अहंवृत्तीसुद्धा (वृत्तीरूप समष्टी अहंकार) म्हणतात.

(२) चेतनाद्वारा अपरा प्रकृतीशी मानलेल्या संबंधाने होणारा तादाम्यरूप अहंकार याला चिज्जडग्रंथीसुद्धा (ग्रंथीरूप व्यष्टी अहंकार) म्हणतात.

धातूरूप अहंकारात कोणताही दोष नाही, कारण हा अहंकार मन, बुद्धी इंद्रिये इत्यादीप्रमाणे एक करणच आहे. म्हणून संपूर्ण दोष तादात्म्यरूप अहंकारात अर्थात देहाभिमानातच आहेत—"**देहाभिमानिनि सर्वे दोषाः प्रादुर्भवन्ति**" जीवन्मुक्त तत्त्वज्ञ भगवत्प्रेमी महापुरुषाचे ठिकाणी तादात्म्यरूप अहंकाराचा संपूर्णपणे अभाव असतो, म्हणून त्याच्या म्हणविल्या जाणाऱ्या, शरीरद्वारा होणाऱ्या संपूर्ण क्रिया धातूरूप अहंकारानेच होत असतात.* परंतु जड प्रकृतीचे कार्य असलेल्या शरीराला आपले स्वरूप मानल्याकारणाने मनुष्य अज्ञानाला वश होऊन आपणाला त्या क्रियांचा कर्ता मानतो आणि बांधला जातो "**अहङ्कारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते**" (३।२७).

तादात्म्यरूप अहंकाराने ("मी आहे") परिच्छिन्नता (एकदेशीयता) येते. परिच्छिन्नता येताच या अहंकाराचे अनेक प्रकार होतात. वर्ण, आश्रम, शरीर, अवस्था, योग्यता, संबंध, व्यवसाय, धर्म, उपासना,

---

* धातूरूप अहंकाराने होणाऱ्या क्रियांना गीतेमध्ये अनेक रीतीने सांगितले गेले आहे. जसे संपूर्ण क्रिया प्रकृतीद्वाराच होतात (१३।२९), प्रकृतीच्या गुणांद्वाराच संपूर्ण क्रिया होतात (३।२७), गुणच गुणांत वर्तत असतात (३।२८, १४।२३) गुणांशिवाय इतर कोणीही कर्ता नाही (१४।१९), इंद्रियेच आपापल्या विषयांत वर्तत आहेत (५।९)

इत्यादींच्या अनुषंगाने अहंकाराचे शेकडो—हजारो प्रकार होतात. जसे—वर्णाच्या अनुषंगाने—"मी ब्राह्मण आहे", "मी क्षत्रिय आहे" इत्यादी, आश्रमाच्या दृष्टीने—"मी ब्रह्मचारी आहे", "मी गृहस्थी आहे" इत्यादी, शरीराच्या दृष्टीने—"मी पुरुष आहे", "मी स्त्री आहे", "मी मनुष्य आहे","मी देवता आहे" इत्यादी, अवस्थेच्या दृष्टीने—"मी बालक आहे",— "मी तरुण आहे" इत्यादी, योग्यतेच्या अनुषंगाने—"मी सुशिक्षित आहे", "मी अशिक्षित आहे", "मी समजदार आहे" इत्यादी, संबंधाच्या दृष्टीने "मी पिता आहे", "मी माता आहे", "मी पुत्र आहे" इत्यादी, व्यवसायाच्या दृष्टीने—"मी अध्यापक आहे", "मी व्यापारी आहे" इत्यादी, धर्माचे अनुषंगाने—"मी हिंदू आहे", "मी मुसलमान आहे", "मी ख्रिश्चन" आहे इत्यादी, उपासनेच्या दृष्टीकोनातून—"मी निर्गुणोपासक आहे", "मी सगुणोपासक आहे", "मी रामाचा उपासक आहे", "मी कृष्णाचा उपासक आहे" इत्यादी. हे सर्वचे सर्व भेद अहम्मध्येच आहेत, तत्त्वामध्ये नाहीत. या सर्वात "मी" तर अनेक आहेत, परंतु "आहे" (सत्ता) एकच आहे.*

संपूर्ण सृष्टी त्रिगुणात्मक आहे. श्रीमद्भागवतामध्ये अहंकारही तीन प्रकारचा सांगितला गेला आहे—सात्त्विक, राजस आणि तामस, म्हणून सत्त्वगुण, रजोगुण आणि तमोगुण यांचे जितके काही भेद या सृष्टीमध्ये सापडतात, ते सर्व अहंकारातच आहेत. जोपर्यंत व्यष्टी अहंकार राहतो

* हा तादात्म्यरूप अहंकार प्राणीमात्रात असतो. तसेच पशू पक्षातही आपल्या जातीचा अहंकार राहतो, म्हणूनच ते आपल्या जातीच्या लोकांबरोबरच राहतात आणि आपल्या जातीमध्येच संतान उत्पन्न करतात. त्यांच्या एका एका जातीतही परस्पर वेग-वेगळा अहंकार राहतो. जसे एक गल्लीचा कुत्रा दुसऱ्या गल्लीत जातो तर दुसऱ्या गल्लीचा कुत्रा त्याला तिथे येऊ देत नाही, त्याच्याशी भांडतो—"कुत्ता देख कुत्ता घुर्राया, मै बैठा फिर तू क्यों आया?" अशा प्रकारे प्राण्यामध्ये अहम् भेद तर आहे परंतु सत्ता भेद नाही.

तोपर्यंत साधकामध्ये आणि त्यांच्या साधनेमध्ये भेद राहतो. परंतु तत्त्वाची प्राप्ती झाल्यास भेद राहत नाही. जोपर्यंत दार्शनिकांमध्ये आणि दर्शन-शास्त्राचे अध्ययन करणाऱ्यांमध्ये थोडाही व्यष्टी अहंकार राहतो, तोपर्यंत दर्शनांचा भेद रहतो.* अहम्‌मुळेच दार्शनिकांमध्ये परस्पर विरोध आणि आपापल्या मताचा आग्रह (पक्षपात) राहतो, ज्यामुळे ते आपल्या मताचे मंडन आणि दुसऱ्याच्या मताचे खंडन करतात. तात्पर्य सूक्ष्म अहम् (आंशिक व्यक्तित्व) राहिल्यानेच मतभेद राहतो, तत्त्वामध्ये मतभेद नाही. अहम्‌चा अत्यंत अभाव झाल्यावर भेद राहत नाही, तर तत्त्व राहते. तत्त्वामध्ये अहम् नाही आणि अहम्‌मध्ये तत्त्व नाही, अहम्‌मुळे वेगळेपणा निर्माण होतो. जेथे वेगळेपणा आहे तेथे बोध कसा असणार आणि जेथे बोध आहे तेथे वेगळेपणा कसा असणार?

"मी आहे" यात "मी" जड आहे आणि "आहे" चेतन आहे. जडाच्या मुख्यतेने संसाराची इच्छा आणि चेतनाच्या मुख्यतेने परमात्म्याची इच्छा उत्पन्न होते. तात्पर्य संसाराच्या इच्छेत "मी" ची प्रधानता आणि परमात्म्याच्या इच्छेत "आहे" ची प्रधानता राहते. मीची (जडाची) प्रधानता असल्याने जीव संसारी होतो आणि "आहे" ची (चेतनाची) प्रधानता असल्याने जीव साधक होतो. म्हणून मुख्यरुपाने

---

*न्याय, वैशेषिक, योग, सांख्य, पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा—हे सहा आस्तिक (ईश्वराची सत्ता मानणारे) दर्शन आहेत. न्यायदर्शन आणि वैशेषिक दर्शनामध्ये भौतिकतेची प्रधानता आहे. योगदर्शन आणि सांख्यदर्शनामध्ये भौतिक आणि आध्यात्मिक दोन्हींचेही वर्णन आहे. पूर्वमीमांसेमध्ये स्वर्गादीची प्राप्ती आणि उत्तर मीमांसा (वेदान्तदर्शन) यामध्ये ब्रह्माची प्राप्ती मुख्य आहे. या दोन्ही दर्शनांना "मीमांसा" म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, यामध्ये आपल्या विचाराची (दर्शन अर्थात अनुभव) मुख्यता नाही, तर वैदिक मंत्रावर विचाराची मुख्यता आहे. या दोन्हीमध्ये वेदान्त दर्शनाचे कित्येक भेद आहेत—जसे अद्वैत, द्वैत, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत, द्वैताद्वैत, अचिन्त्यभेदाभेद इत्यादी.

तादात्म्यरूप अहंकाराचे दोन भेद आहेत (१) लौकिक अहंकार—जसे "मी संसारी आहे" आणि (२) पारमार्थिक अहंकार—जसे "मी साधक आहे".

## १—लौकिक अहंकार

जेव्हा मनुष्याचा उद्देश्य असत् भोग आणि संग्रह यांच्या प्राप्तीचा असतो तेव्हा त्याच्या ठिकाणी "मी संसारी आहे" हा लौकिक अहंकार राहतो. असा अहंकार दृढ झाल्यावर मनुष्य निरंतर संसारी राहतो. सांसारिक कार्य करताना तर तो संसारी राहतच असतो, साधन करीत असतानाही तो संसारीच राहतो, म्हणून तो जे काही साधन करतो, ते कामनेला अनुसरूनच (कामनापूर्तीसाठी) करतो आणि ते साधन त्याचे ठिकाणी साधकपणाचा अभिमान वाढविणारा होते. अभिमान अहंकाराचेच स्थूल रूप आहे.

जेव्हा मनुष्याचे ठिकाणी भोग भोगण्याची आणि संग्रह करण्याची प्रवृत्ती वाढते, तेव्हा त्याचे ठिकाणी स्वार्थ आणि अभिमान येतात, जी आसुरी संपत्ती आहे. स्वार्थ आणि अभिमान आल्याने त्याचा अहंकार आसुरी संपत्तीवाला होतो—"**अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः**" (गीता १६।१८), "**दम्भाहङ्कारसंयुक्ताः**" (गीता १७।५). आसुरी संपत्तीवाला अहंकार भयंकर नरकात घेऊन जातो—"**पतन्ति नरकेऽशुचौ**" (गीता १६।१६).

जर असे मानाल की, ज्ञान (मुक्ती) झाल्यास असुरी संपत्ती असणारा अहंकारसुद्धा नष्ट होतो, तादात्म्यरूप अहंकार नष्ट होत नाही, तर असे मानणे योग्य नाही. कारण आसुरी संपत्तीवाला अहंकार नष्ट झाल्याने नरकापासून तर सुटका होते पण मुक्ती होत नाही. मुक्ती तर तादात्म्यरूप अहंकार नष्ट झाल्यानेच होते. आसुरी संपत्तीवाला अहंकार तर तादात्म्यरूप अहंकाराचेच स्थूल रूप आहे, जो संपूर्ण जीवाच्या ठिकाणी राहतो. याच तादात्म्यरूप अहंकाराला उद्देशून भगवान अर्जुनाला म्हणतात—"**अथ चेत्त्वमहङ्कारान्न श्रोष्यसि**

**विनङ्क्ष्यसि**'' (गीता १८।५८), ''**यदहङ्कारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे**'' (गीता १८ ।५९).

अहंकाराची उत्पत्ती अविद्येपासून होते—**अविद्यास्मितारागद्वेषाभिनिवेशाः क्लेशाः। अविद्या क्षेत्रमुत्तरेषां.........**'' (योगदर्शन २।३-४) ज्ञान झाल्यावर अविद्या नष्ट होते. जर अविद्या राहिली नाही, तर मग अविद्येपासून उत्पन्न होणारा अहंकार कसा राहील? ज्या ज्ञानाने अविद्येचा नाश होणार नाही, त्याला ज्ञान कसे म्हणता येईल? ते तर शिकाऊ ज्ञान आहे, अनुभवाचे ज्ञान नव्हे, जर तादात्म्यरूप अहंकार नष्ट झाला नाही, तर जसे बीजापासून वृक्ष उत्पन्न होतो, तसेच प्राकृत पदार्थ, व्यक्ती, क्रिया, परिस्थिती इत्यादीचा संग मिळाल्याने तो अहंकारसुद्धा आसुरी संपत्तीवाला होईल.

गीतेमध्ये ज्या ठिकाणी ज्ञानाच्या साधनांचे वर्णन झाले आहे, त्या ठिकाणी भगवंतांनी अहंकाररहित होण्याविषयी म्हटले—''**अनहङ्कार एव च**'' (गीता १३।८).जर साधकअवस्थेतही हा अहंकार नष्ट होऊ शकतो, तर मग सिद्ध झाल्यास हा कसा राहील? सिद्ध झाल्यावर तर तादात्म्यरूप अहंकाराचा संपूर्णपणे नाश होतो. भगवंतांनी कर्मयोगामध्ये ''**निर्ममो निरहङ्कार**'' (गीता २।७१) पदांनी, ज्ञानयोगामध्ये ''**अहङ्कारं....विमुच्य निर्ममः**'' (१८।५३) पदांनी, आणि भक्तियोगामध्ये नाशाविषयीच सांगितले आहे.

## २—पारमार्थिक अहंकार

जेव्हा मनुष्याचा उद्देश्य केवळ सत्-तत्त्व प्राप्त करण्याचा होतो, तेव्हा तो त्याच्या प्राप्तीसाठी ''मी साधक आहे'' या पारमार्थिक अहंकाराच्या अनुषंगाने साधन करतो. ''मी साधक आहे'' हा अहंकार मुक्त करणारा आहे.* अहम्‌मध्ये झालेला निश्चय निरंतर राहतो.

''अस अभिमान जाइ जनि भोरे। मैं सेवक रघुपति पति मोरे॥''

''दासोऽहं कोसलेन्द्रस्य''—हा पारमार्थिक अहंकार आहे. वास्तविक हा अहंकार नाही, तर भगवंतावर दृढ विश्वास आहे आणि तादात्म्यरूप अहंकाराचा नाश करून मुक्ती देणारा आहे.

म्हणून ''मी साधक आहे'' असा अहंकार दृढ झाल्यास साधकाकडून निरंतर साधन होत राहते. साधन करतेवेळी तर तो साधक राहतोच, सांसारिक कार्य करतेवेळीही तो साधकच राहतो. म्हणून तो जे काही सांसारिक कार्य करतो, ते स्वत:च्या साधनानुरूपच करतो. जसे लोभी माणूस असे कोणतेही कार्य करीत नाही, ज्यामुळे धनाचा नाश होईल, तसेच तो साधक स्वत:च्या साधनेविरुद्ध कोणतेही कार्य करीत नाही.

साधकाची साधनेशी आणि साधनेची साध्याशी एकता असते. म्हणून जोपर्यंत साधक साधनेत तल्लीन होत नाही, तोपर्यंत साध्य (परमात्मतत्त्व) प्राप्त होत नाहीं. जोपर्यंत साधकाचे ठिकाणी अहंकार राहतो, तोपर्यंत तो साधनेमध्ये तल्लीन होत नाही. अहंकार नष्ट झाल्यावर साधक साधनेमध्ये तल्लीन होतो अर्थात साधक राहत नाही, तर केवळ साधन राहते. केवळ साधन राहिल्यास साधन साध्यात परिणत होते अर्थात साध्य प्राप्त होते.

साधनभेदाने कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—हे तीन भेद-सुद्धा अहंकारामुळेच होतात. साधक जस-जसा साधनेत अग्रेसर होतो, तस-तसा अहंकार नष्ट होतो आणि जस-जसा अहंकार नष्ट होतो, तस-तसा कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोगाचा भेदसुद्धा नाहीसा होतो. कर्मयोगामध्ये अहंकार राहत असूनही साधन केले जाऊ शकते, कर्मयोग सिद्ध झाल्यावर हा अहंकार नष्ट होतो. ज्ञानयोगामध्ये अहंकार ब्रह्माशी एक होतो. भक्तियोगामध्ये अहंकार भगवतचरणी अर्पित होतो. तात्पर्य हे आहे की, कर्मयोगामध्ये अहम् शुद्ध होतो, ज्ञानयोगामध्ये अहम नष्ट होतो आणि भक्तियोगामध्ये अहम् बदलतो. अहम्चे शुद्ध होणे, नष्ट होणे आणि बदलणे—हे तिन्ही परिणामी एक होतात.

कर्मयोग भौतिक साधना आहे, ज्ञानयोग आध्यात्मिक साधना आहे आणि भक्तियोग आस्तिक साधना आहे, भौतिक साधनेमध्ये ''अकर्माची''

प्रधानता राहते, आध्यात्मिक साधनेमध्ये "आत्म्या" ची मुख्यता राहते आणि आस्तिक साधनेमध्ये "परमात्म्या" ची मुख्यता राहते. म्हणून कर्मयोगी संपूर्ण कर्मामध्ये एका अकर्माला पाहतो "**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः**" (गीता ४।१८), ज्ञानयोगी संपूर्ण प्राण्यांमध्ये एका आत्म्याला पाहतो—"**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि**" (गीता ६।२९), आणि भक्तियोगी सर्वांमध्ये एका परमात्म्याला पाहतो अर्थात अनुभव करतो—"**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति**" (गीता ६।३०), अकर्म, आत्मा तसेच परमात्मा तिन्हीही तत्त्वाच्या दृष्टीने एकच आहेत. म्हणून "अकर्म" यामध्ये आत्माही आहे आणि परमात्माही आहे, "आत्मा" यामध्ये अकर्महीं आहे आणि परमात्माही आहे, तसेच "परमात्मा" यामध्ये अकर्महीं आहे आणि आत्माही आहे. तात्पर्य अहंकारामुळे अकर्म, आत्मा आणि परमात्मा हे तीन भेद होतात. तत्त्वामध्ये हे तीन भेद नाहीत.

अकर्माचा अनुभव केल्यामुळे कर्मयोगी कृतकृत्य होतो अर्थात त्याच्यासाठी काहीही करणे शिल्लक राहत नाही. आत्म्याचा अनुभव आल्यामुळे ज्ञानयोगी ज्ञातज्ञातव्य होतो, अर्थात त्याच्यासाठी काहीही जाणणे शिल्लक राहत नाही. परमात्म्याचा साक्षात्कार झाल्याने भक्तियोगी प्राप्तप्रातव्य होतो अर्थात त्याला काहीही मिळवायचे शिल्लक राहत नाही.

कृतकृत्य झाल्याने कर्मयोगी ज्ञातज्ञातव्य आणि प्राप्तप्राप्तव्यही होतो, ज्ञातज्ञातव्य झाल्यामुळे ज्ञानयोगी कृतकृत्य आणि प्राप्तप्राप्तव्यही होतो तसेच प्राप्तप्राप्तव्य झाल्याने भक्तियोगी कृतकृत्य आणि ज्ञातज्ञातव्यही होतो. कृतकृत्य, ज्ञातज्ञातव्य आणि प्राप्तप्राप्तव्य झाल्याने तादात्म्यरूप अहंकार संपूर्णपणे नष्ट होतो अणि तत्त्व राहते अर्थात अनुभवाला येते. मग साधकांच्या साधनांचा भेद राहत नाही. साधक साधन होऊन साध्यही होतो.

**प्रश्न**—आपले स्वरूप अहम्‌हून (मीपणाहून) रहित आहे—याचा अनुभव कसा करावा?

**उत्तर**—सत्तामात्र अर्थात केवळ असणेपणा हेच आपले स्वरूप आहे. या सत्तेशिवाय इतर सर्वांचा अभाव आहे. जितके काही पाहणे, ऐकणे आणि समजण्यात येते तसेच ज्या यंत्रांनी (शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी) पाहतो, ऐकतो आणि समजून घेतो, तसेच पाहणे, ऐकणे आणि समजणे—हे सर्वचे सर्व क्षणंगुर आहेत अर्थात यांची एकक्षणसुद्धा सत्ता (अस्तित्व) नाही. परंतु स्वत:सिद्ध सत्तेचा क्षणमात्रसुद्धा कधी अभाव झाला नाही, होत नाही, होणार नाही आणि होऊ शकत नाही.

आपला जो असणेपणा (स्वरूप) आहे, ''मी'' नाही आणि जो ''मी'' आहे त्यात असणेपणा नाही., जेवढे म्हणून विकार आहेत, सर्व मीपणातच आहेत, स्वरूपात नाहीत. सत्तारूप असल्याने स्वरूप स्वत: निर्लिप्त आहे. या स्वत:सिद्ध सत्तेमध्ये (स्वरूपामध्ये) कधीही कोणताही विकार झाला नाही, होत नाही, होणार नाही आणि होऊ शकत नाही. मीपणाचा नित्य-निरंतर विकारी राहण्याचा स्वभाव आहे आणि स्वरूपाचा नित्य निरंतर निर्विकार राहण्याचा स्वभाव आहे. स्वत:सिद्ध सत्तेमध्ये कर्तृत्वही नाही आणि भोक्तृत्वही नाही—''**न करोति न लिप्यते**'' (गीता १३।३१) करणेही नाही आणि करविणेही नाही—''**नैव कुर्वन्न कारयन्**'' (गीता ५।१३)

गीतेमध्ये भगवंतांनी म्हटले आहे—

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च।**
**अहङ्कार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा॥**

(७।४)

''पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश—हे पंचमहाभूत आणि मन, बुद्धी तसेच अहंकार—ही आठ प्रकारची भेद असणारी माझी अपरा प्रकृती आहे.''

तात्पर्य पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, मन, बुद्धी आणि अहम् हे

सर्व एकाच जातीचे (अपरा) आहेत. म्हणून ज्या जातीची पृथ्वी आहे त्याच जातीचे अहम् (मीपणा) आहे अर्थात मातीच्या ढेकळाप्रमाणे मीपणासुद्धा जड आणि दृश्य आहे. जे पदार्थ दृश्य आहेत, तसा हा मीपणाही दृश्य आहे अर्थात पदार्थाप्रमाणे हा मीपणा जाणण्यात येणारा आहे. आपले स्वरूप अहम्हून वेगळे आहे. लक्षवेधण्यासाठी एक गोष्ट सांगितली जाते.

सुषुप्तीतून (गाढ निद्रेतून) जागे झाल्यावर आपण म्हणतो की, मी असा सुखाने झोपलो होतो की मला कशाचाही पत्ता नव्हता. पत्ता यासाठी नव्हता की, त्यावेळी अहम् नव्हता अर्थात अहम् अविद्येमध्ये लीन झाला होता. परंतु आपण तर त्यावेळी होतोच. जर आपण नसतो तर "कशाचाही पत्ता नव्हता" याचा पत्ता कोणाला लागला असता? जागृत झाल्यानंतर कोण म्हणतो की, मला कशाचाही पत्ता नव्हता? पत्ता लावणारा जो अहंभाव होता, तो तर नव्हता, पण आपण तर होतोच. जसे एखाद्या घरी एखादा माणूस आहे. बाहेरून अमुक मनुष्य घरी आहे काय म्हणून एखादा हाक मारतो? त्यावेळी तो घरातला माणूस घरी नाही असे सांगतो. तर "घरी नाही" म्हणणारासुद्धा नाही काय? जर घरी कुणीही नसते तर तो घरी नाही कोणी म्हटले असते? बोलणारा तर आहेच. याप्रमाणे सुषुप्तीमध्ये "मला कशाचाही पत्ता नव्हता" हे जाणणारा तर होताच. तात्पर्य सुषुप्तीत मीपणा तर राहत नाही, परंतु आपला असणेपणा अर्थात सुषुप्तीमध्ये मीपणारहित आपली सत्ता सिद्ध होते.

आपण मीपणाचा भाव आणि अभाव दोघांना जाणणारे आहोत. मीपणाचा अभाव होतो, परंतु आपला अभाव होत नाही. संपूर्ण संसार नष्ट झाला तरीही आपली सत्ता राहत असते. म्हणून सत्ता (असणेपणा) आपले स्वरूप आहे. मीपणा आपले स्वरूप नाही.



# ५. उद्देशाचे महत्त्व

परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीमध्ये उद्देशाचे महत्त्व पंधरा आणे, भावाचे महत्त्व तीन पैसे आणि क्रियेचे महत्त्व एक पैसा आहे. परंतु आजकाल साधकाची दृष्टी प्राय: क्रियेवरच आहे, भावावर नाही आणि उद्देशावर तर नाहीच. म्हणून उद्देशाच्या महतीवर विचार केला जात आहे.

आपल्या जीवनभराचा उद्देश्य काय आहे? आपल्याला काय प्राप्त करावयाचे आहे? कोणते तत्त्व जाणून घ्यावयाचे आहे? कोणाला ओळखावयाचे आहे? कशाचा साक्षात्कार करावयाचा आहे? असा विचार झाल्यास मनुष्याचा हा उद्देश होईल की, आपणाला केवळ परमात्म्याला प्राप्त करावयाचे आहे, परमात्मतत्त्वाला जाणावयाचे आहे, परमात्म्याशी असलेल्या आपल्या नित्य-निरंतर संबंधाला ओळखावयाचे आहे, परमात्म्याचा साक्षात्कार करून घ्यावयाचा आहे. कारण तोच नित्य-निरंतर राहणारा आहे, दुसरा कोणीही नित्य-निरंतर राहणारा नाही. संसाराचा विषय मिळो अथवा न मिळो, भाकरी मिळो अथवा न मिळो, वस्त्र मिळो अथवा न मिळो, झोप मिळो अथवा न मिळो, आराम मिळो अथवा न मिळो, मान होवो अथवा अपमान होवो, प्रशंसा होवो अथवा निंदा होवो, आपणाला त्याच्याशी काहीही संबंध नाही, आपणाला तर केवळ परमात्मतत्त्वच प्राप्त करावयाचे आहे—

**निन्दन्तु नीतिनिपुणा यदि वा स्तुवन्तु**
**लक्ष्मीः समाविशतु गच्छतु वा यथेष्टम्।**
**अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा**
**न्याय्यात्पथः प्रविचलन्ति पदं न धीराः॥**

(भर्तृहरिनीतिशतक)

''नीति-निपुण लोक निंदा करोत अथवा स्तुती, लक्ष्मी राहो अथवा तिच्या इच्छेप्रमाणे कुठेही जावो आणि मृत्यू आजच होवो

अथवा'' युगान्तराने होवो, आपल्या उद्देशावर दृढ राहणारे धीर पुरुष न्याय-पथावरून एक पाऊलही मागे हटत नाहीत.''

अशाप्रकारे ज्याचा एकमात्र उद्देश्य, ध्येय, लक्ष्य, परमात्मतत्त्व प्राप्तीचे निश्चित ठरले आहे, तो प्रत्येक ठिकाणी टिकू शकणार नाही. जेथे पैसा मिळत नाही, उलट खर्चच होतो, त्या ठिकाणी पैशाचा लोभी टिकू शकतो काय? ज्याचा वास्तविक उद्देश्य परमात्मप्राप्तीचा आहे, सुंदर गोष्टी सांगून कोणी एखादा त्याला भ्रमित करू शकतो काय? परमात्मतत्त्व काय आहे? माझे स्वरूप काय आहे? जगताचे स्वरूप काय आहे? अशी ज्याची उत्कट जिज्ञासा आहे, तो प्रत्येक कथेमध्ये, प्रत्येक व्याख्यानामध्ये टिकू शकत नाही. त्या ठिकाणी थांबण्याची त्याची ताकदच नसते. जर तो थांबत असेल तर त्याचा उद्देश्य अद्याप निश्चित झाला नाही, मग तो कितीही उच्च कोटीचा पंडित का असेना!

आपल्याला तर केवळ परमात्मप्राप्ती करावयाची आहे—हा उद्देश्य असा आहे, जो एकटा पंधरा आणे किंमतीचा आहे, भाव तर बदलत राहतो. कधी चांगला भाव निर्माण होतो, कधी वाईट भाव उत्पन्न होतो, कधी सात्त्विक भाव निर्माण होतो, कधी राजस अथवा तामस भाव उत्पन्न होतो. परंतु उद्देश्य कधी बदलत नाही. जर बदलत असेल तर उद्देश्य अद्याप निश्चित झाला नाही अथवा आपला वास्तविक उद्देश्य ओळखलाच नाही.

उद्देश्य माणसाची प्रतिष्ठा आहे. ज्याला कोणताही उद्देश्य नाही तो वास्तविक मनुष्य नाही, वर्तमानकाली अनेक मोठमोठ्या शाळा आणि कॉलेज आहेत, ज्याठिकाणी लाखांनी विद्यार्थी शिकत आहेत, परंतु विद्यार्थ्यांना का शिकविले जाते? विद्यार्जन कशासाठी केले पाहिजे? याचा आजपर्यंत कोणताही एक उद्देश्य निश्चित झाला नाही, शिकतात तर खरे पण आपल्या उद्देशाला जाणतच नाहीत, ही केवढी आश्चर्याची गोष्ट आहे?

वास्तविक उद्देश्य निश्चित करण्यापेक्षा उद्देश्य ओळखणे श्रेष्ठ

आहे. मनुष्यशरीर आपण आपल्या इच्छेने घेतलेले नाही. भगवंतांनी आपल्या प्राप्तीच्या उद्देश्यानेच हे मनुष्यशरीर प्रदान केले आहे.[१] या उद्देशामुळेच मनुष्यशरीराचे महत्त्व आहे, नाहीतर पंचमहाभूतापासून तयार झालेल्या या शरीराचे काहीही महत्त्व नाही, शरीर तर मल-मूत्र तयार करण्याचा एक कारखाना आहे. भगवंतांना अर्पण केलेली उत्तमातीउत्तम मिठाई या मशीनमध्ये टाकाल तर ती विष्ठा बनेल. गंगेचे, यमुनेचे महान पवित्र पाणी या मशीनमध्ये टाकाल तर ते मूत्र बनेल. जी अशी अत्यंत घाण वस्तू उत्पन्न करण्याची मशीन आहे, त्या शरीराचे काहीही महत्त्व नाही. वास्तविक परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीच्या उद्देशाचेच महत्त्व आहे.[२] हा उद्देशच वास्तविक मनुष्यता आहे. म्हणून भगवंतांनी ज्या उद्देशाने जीवाला मनुष्यशरीर दिले आहे[३], तो उद्देश्य ओळखावयाचा आहे. तात्पर्य हे झाले की, उद्देश्य प्रथम बनला आहे, शरीर नंतर मिळाले आहे. जसे बद्रीनारायणाला जाण्याचा उद्देश्य प्रथम बनतो, यात्रा त्यानंतर सुरू होते. म्हणून उद्देश्य ओळखावयाचा आहे, बनवायचा नाही. त्या उद्देशाच्या सिद्धीसाठी भगवंतांनी सर्व माणसांना योग्यता दिली आहे, अधिकार दिला आहे, विवेक दिला आहे. म्हणून मनुष्यमात्र परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीचा अधिकारी आहे. सर्वांचा धनासाठी सारखा अधिकार नाही, मान-

---

१-कबहुँक करि करुना नर देही। देत ईस बिनु हेतु सनेही॥
(मानस ७।४४।३)

"ऐहि तन कर फल बिषय न भाई" (मानस ७।४४।१), "साधन धाम मोच्छ कर द्वारा" (मानस ७।४३।४)

२-छिति जल पावक गगन समीरा। पंच रचित अति अधम सरीरा॥
(मानस ४।११।२)

३-नर तन सम नहिं कवनिउ देही। जीव चराचर जाचत तेही॥
नरक स्वर्ग अपबर्ग निसेनी। ग्यान बिराग भगति सुभ देनी॥
(मानस ७।१२१।५)

सन्मानासाठी सारखा अधिकार नाही, निरोगतेसाठी सारखा अधिकार नाही, शंभर वर्षे जगण्याचा सारखा अधिकार नाही, परंतु परमात्मतत्त्व प्राप्तीचे सर्वचे सर्व सारखे अधिकारी आहेत. जो निरक्षर आहे, ज्याचे ठिकाणी विवेक नाही, वैराग्य नाही, षट्संपत्ती नाही, मुमुक्षुता नाही, श्रवण-मनन-निदिध्यासन नाही, परंतु परमात्मतत्त्व जाणून घेण्याची तीव्र जिज्ञासा आहे अथवा जो संसारातून उबगलेला आहे, ज्याला संसार दुःखरूप दिसत आहे, तोसुद्धा परमात्मतत्त्व जाणू शकतो. म्हणूनच भगवंतांनी म्हटले आहे—''**श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्**'' (गीता २।२९), ऐकूनसुद्धा कोणी जाणत नाही''. तात्पर्य शिकून, प्रयत्न करून, परिश्रम करून एखादा हे तत्त्व जाणेल—ही गोष्ट असंभवनीय आहे. जसे करोडपती मनुष्याजवळ कस्तूरी मिळत नाही कारण त्याने खरेदीच केलेली नसते. परंतु रानटी मनुष्याजवळसुद्धा कस्तूरी मिळून जाते, कारण त्याने कस्तूरीमृगापासून कस्तूरी काढून घेतलेली असते. त्याचप्रमाणे सामान्यातीसामान्य माणसालासुद्धा (तीव्र जिज्ञासा झाल्यास) तत्त्वप्राप्ती फारच सुगमतेने होऊ शकते.

जसे एखाद्या पर्वतावर मंदिर आहे. त्या मंदिराकडे जाण्याचा उद्देश्य झाल्यास यात्रेकरू सडकेने चालत मंदिरापर्यंत पोहोचतो, परंतु रानटी माणूस सडकेने न जाता आडमार्गाने सरळच त्या पर्वतावर चढून मंदिरापर्यंत पोहचतो. त्याचप्रमाणे श्रवण-मनन-निदिध्यासन इत्यादी साधने करणाऱ्यांना तत्त्वप्राप्ती लवकर होत नाही, परंतु तत्त्व-प्राप्तीचा दृढ उद्देश झाल्यास सामान्य माणसालासुद्धा तत्त्वप्राप्ती लवकर होऊ शकते. तात्पर्य उद्देशामध्ये जी शक्ती आहे, ती साधनेमध्ये नाही. म्हणून ज्याचा स्वतःचा असा उद्देश निश्चित झाला आहे की, आता मला परमात्मप्राप्तीच करावयाची आहे, तोच परमात्मप्राप्ती करू शकतो. जर स्वतःचा उद्देश निश्चित झाला नसेल, तर कितीही शिका, ध्यान करा, समाधी लावा, परंतु परमात्मप्राप्ती होऊ शकत नाही. कारण शिकणे,

साधन करणे मुख्य नाही, तर उद्देश मुख्य आहे. उद्देशाचे जे महत्त्व आहे, ते समाधीचेही नाही.

क्रियेचे महत्त्व केवळ एका पैशाचे आहे. जप, ध्यान, स्नान, तीर्थ, व्रत, उपवास इत्यादी केवळ केल्याने तत्त्वाची प्राप्ती होत नाही. टेपरेकॉर्डर आठ प्रहरपर्यंत नाम जप करू शकतो, परंतु त्याला तत्त्वाची प्राप्ती होत नाही. तत्त्वप्राप्ती त्यालाच होते, ज्याच्या अंत:करणात तत्त्वप्राप्तीचा भाव (उद्देश) असतो. भंगी सफाई करतो, परंतु त्याचा उद्देश्य सर्वांची सेवा करण्याचा, सर्वांचे दु:ख दूर करण्याचा असला, तर त्याला तत्त्वप्राप्ती होईल. जो अत्यंत मूर्ख आहे, काहीही जाणत नाही, त्यानेही जर दृढतेने हे मानले की "मी भगवंताचा आहे, भगवान् माझे आहेत" तर त्याला तेच तत्त्व मिळेल, जे तत्त्व उच्चातीउच्च संत महात्म्याला मिळते. म्हणून साधकाने एक उद्देश निश्चित केला पाहिजे की मला, ते तत्त्वच प्राप्त करावयाचे आहे. त्याशिवाय मला इतर कहीही करणे, जाणणे आणि मिळविणे नाही. असा ज्याचा उद्देश निश्चित होईल, तर मग तो कोणत्याही लोभाने अथवा कोणत्याही भयाने विचलित केला जाऊ शकत नाही. जसे समुद्रामध्ये कावळा उडत असताना तेथेच येऊन बसतो जेथे जहाज असते. जा ठिकणी पाणीच पाणी भरलेले आहे त्या ठिकाणी त्याची बसण्याची ताकदच नाही, कारण तेथे बसला तर बुडून मरेल, त्याचप्रमाणे ज्याचा परमात्मप्राप्तीचा उद्देश्य बनला आहे, तो ठिक-ठिकाणी भटकणार नाही, तर जेथे त्याला तत्त्वप्राप्तीचा विषय प्राप्त होईल, तेथेच तो टिकून राहील.

**प्रश्न**—मुमुक्षा आणि उद्देश यामध्ये काय अंतर आहे?

**उत्तर**—मुमुक्षामध्ये बंधनातून मुक्त होण्याची (सुटण्याची) इच्छा असते आणि उद्देशामध्ये तत्त्व जाणण्याची इच्छा (जिज्ञासा) असते. मुमुक्षेत बंधनाचे दु:ख प्रधान आहे आणि जिज्ञासेत विवेक प्रधान आहे, मुमुक्षा प्रत्येक प्राण्यात राहते. एखाद्या कुत्र्याला दोरीने बांधले तर त्याचे

ठिकाणीही मी या बंधनातून सुटून जावे अशी मुमुक्षा असते, परंतु त्याला जिज्ञासा राहत नाही.

**प्रश्न**—भाव आणि उद्देश यामध्ये काय अंतर आहे?

**उत्तर**—भाव दोन प्रकारचे आहेत—बदलणारा भाव आणि न बदलणारा (स्थायी) भाव. बदलणारा भाव अंत:करणाच्या (बदलणाऱ्या) भावाचे महत्त्व तीन पैसे सांगितले गेले आहे, परंतु स्थायी भाव आणि उद्देश दोन्ही सारखे महत्त्वाचे आहेत. दोन्हीमध्ये अंतर केवळ एवढेच आहे की, स्थायी भाव (भगवंताचे ठिकाणी आत्मीयतेचा भाव) भक्तियोगाचा असतो परंतु उद्देश कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—तिन्हींचा होऊ शकतो.



# ६. साधक कोण आहे?

साधक तो आहे, ज्याचे ठिकाणी असाधन अर्थात साधनविरुद्ध गोष्ट नसावी. सांसारिक भोग तसेच संग्रहाचा उद्देश आणि रुची असणे हीच साधनविरुद्ध गोष्ट आहे. साधनविरुद्ध उद्देश आणि रुची बरोबर राहिल्यामूळे साधन करीत असला तरीही प्रगती होत नाही. जोपर्यंत धन, मान, सन्मान, आराम इत्यादीविषयी उद्देश आणि प्रियता बरोबर राहते, तोपर्यंत, मनुष्य वास्तविक साधक नसतो.

कधी पारमार्थिक रुची, कधी सांसारिक रुची, कधी सद्‌गुण सदाचार, कधी दुर्गुण-दुराचार अशा प्रकारे साधने बरोबर साधनविरुद्ध गोष्ट तर प्रत्येक सामान्य मनुष्याचे ठिकाणी राहते. एखाद्या माणसात साधनेची मुख्यता राहते आणि एखाद्या माणसात साधनविरुद्ध आचरणाची मुख्यता राहते. परमात्म्याचा अंश असल्यामुळे सद्‌गुण-सदाचार संपूर्णपणे रहित कोणताही मनुष्य असू शकत नाही. मनुष्यात केवळ सद्गुण-सदाचार तर राहू शकतात, परंतु केवळ दुर्गुण-दुराचार राहूच शकत नाहीत. म्हणून थोड्याशा सद्‌गुण-सदाचारावरून, थोड्याशा साधनावरून जो स्वतःला साधक मानतो, तो चूक करतो, वास्तविक ज्या मनुष्यात साधनविरुद्ध आचरण नाही, भोग तसेच संग्रहाचा उद्देश्य नाही, तर एकमात्र परमात्मतत्त्व प्राप्तीचाच उद्देश्य आहे, तोच साधक म्हणविण्या-लायक आहे.

ज्याचा असा भाव राहतो की ''आपण बाबाजी (साधू) थोडेच आहोत! आपण तर गृहस्थी आहोत, संसारात राहतो, पैसा मिळविण्यासाठी असत्य, कपट, बेईमानी इत्यादी तर करावेच लागते, कारण त्याशिवाय पैसा मिळत नाही, काम चालत नाही'' इत्यादी, तो साधक नसतो, तर ''संसारी'' असतो. परंतु ज्याचा असा भाव राहतो की ''मी तर साधक आहे आणि मला केवळ तत्त्वप्राप्ती करावयाची आहे, म्हणून मी साधन-विरुद्ध कार्य कसा करू शकतो'', तो ''साधक'' असतो.

साधकाचा असा भाव असतो की, जीवननिर्वाहासाठी असत्य, कपट, बेईमानी इत्यादी करण्याची गरजच नाही. काम चालविण्याची जबाबदारी ईश्वरावर आहे, आपणावर नाही. समजा अन्न-पाणी मिळाले नाही म्हणून मरावे लागेल तर ज्यांना अन्न-पाणी मिळते ते काय मरणार नाहीत? ठरलेल्या वेळेपूर्वी कोणीही मरूच शकत नाही, मग जीवननिर्वाहासाठी चिंता करण्याची काय आवश्यकता आहे?[१]

जो मनुष्य संसारी असतो, त्यात सांसारिकपणा अखंड असतो अर्थात तो ज्या रीतीने सांसारिक कार्य करतो, त्याच रीतीने पारमार्थिक कार्यही (साधन) करतो, परंतु जो मनुष्य साधक असतो, त्यात साधकपणा अखंड असतो अर्थात तो ज्या रीतीने पारमार्थिक कार्य (साधन) करतो, त्याच रीतीने सांसारिक कार्यसुद्धा करतो. सांसारिक रुची असणारा मनुष्य सांसारिक कार्य तर लिप्त (तल्लीन) होऊन करतो, परंतु पारमार्थिक कार्य निर्लिप्त होऊन (केवळ नियमपूर्तीसाठी) करतो. परंतु पारमार्थिक रुची असणारा साधक पारमार्थिक कार्य तर लिप्त (तल्लीन) होऊन करतो, परंतु सांसारिक कार्य निर्लिप्त होऊन (कर्तव्य मात्र समजून) करतो.

सावधानी हेच साधन आहे. म्हणून साधक नेहमी सावधान राहतो की, आपल्याकडून कधीही साधनविरुद्ध क्रिया घडू नये, राग-द्वेष, काम-क्रोधादिंच्या वृत्ती निर्माण झाल्या तरीही तो त्यानुसार क्रिया करीत नाही.[२] जर आपल्या सवयीनुसार अथवा चुकून एखादी साधन-विरुद्ध क्रिया जरी घडली तरीही त्याचा उद्देश साधनविरुद्ध क्रिया

१-प्रारब्ध पहले रचा, पीछे रचा शरीर।
तुलसी चिन्ता क्यों करे, भज ले श्रीरघुबीर॥

२-इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ।
तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ॥

(गीता ३। ३४)

"इंद्रिय-इंद्रियांच्या विषयामध्ये राग आणि द्वेष व्यवस्थेनुसार (अनुकूलता-प्रतिकूलता यांच्या अनुषंगाने) स्थित आहेत. मनुष्याने त्या दोन्हींना वश होऊ नये अर्थात त्यानुसार क्रिया करू नये, कारण ते दोन्हीही याच्या पारमार्थिक मार्गात विघ्न करणारे शत्रु आहेत."

करण्याचा नसतोच. जाणून-बुजून तो कोणतीही साधनविरुद्ध क्रिया करीत नाही. जसे एखादा माणूस पैसा मिळवितो आणि प्रसंगानुसार खर्चही करतो तर तो पैशाचा वास्तविक लोभी नव्हे. जो वास्तविक लोभी असेल, तो कष्ट भोगेल, परंतु जाणून-बुजून पैसा खर्च करणार नाही, येथून तेथपर्यंत जाण्यासाठी चार पैसेसुद्धा लागत असतील तर तो चालत जाईल पण चार पैसे खर्च करणार नाही. त्याचप्रमाणे साधकातही साधनेचा लोभ असावा. जसा डोळ्यात कचरा जाणे माणसाला सहन होत नाही तसे साधनेची थोडीही हानी सहन होऊ नये. जो साधक साधनेचा लोभी असतो, त्याच्याद्वारा जर एखादी साधन-विरुद्ध क्रिया घडली, तर त्याला दुःख होते, दाह होतो, पश्चात्ताप होतो. असे झाल्याने साधन-विरुद्ध क्रिया होणे बंद होते.

परमात्मतत्त्वाची प्राप्ती स्त्रीलाही होत नाही, पुरुषालाही होत नाही, साधूलाही होत नाही, गृहस्थीलाही होत नाही, ब्राह्मणलाही होत नाही, क्षत्रियालाही होत नाही अर्थात भगवतप्राप्ती कोणत्याही जाती, वर्ण, आश्रम, सांप्रदाय इत्यादींच्या व्यक्तींना होत नाही, तर साधकाला होते. म्हणून जो साधक असतो, तो स्त्री, पुरुष, साधू, गृहस्थी इत्यादी नसतो.* तात्पर्य साधकामध्ये जाती, वर्ण, आश्रम, सांप्रदाय इत्यादींचा अभिमान नसतो, किंवा त्यांचा आग्रह नसतो आणि दुसऱ्याविषयी कनिष्ठपणाचा भाव नसतो.

**प्रश्न**—साधकाचे लक्षण कोणते आहे ?

**उत्तर**—संसाराविषयी वैराग्य आणि परमात्म्याविषयी प्रेम असणे हे साधकाचे लक्षण आहे.

**प्रश्न**—सज्जन आणि साधकात काय फरक आहे ?

---

* नाहं मनुष्यो न च देवयक्षौ न ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्रः।
न ब्रह्मचारी न गृही वनस्थो भिक्षुर्न चाहं निजबोधरूपः॥
(हस्तामलकस्तोत्र)

**उत्तर**—ज्याचे विचार आणि आचरण योग्य आहे, जो सद्‌गुणी आणि सदाचारी आहे, तो "सज्जन" असतो आणि ज्याच्यात भगवत-प्राप्तीची, कल्याणाची उत्कंठा आहे, तो "साधक" असतो. साधक तर सज्जन असतोच, परंतु सज्जन साधक असतोच—असा काही नियम नाही.

जो दुसऱ्यांचे मत, सांप्रदाय यांची निंदा करतो, त्यांचे खंडन करतो, विरोध करतो, तो सज्जन तर असू शकतो, परंतु साधक असू शकत नाही. साधक तोच असतो जो आपले मत, सांप्रदायाचे तर अनुसरण करतो, परंतु दुसऱ्यांच्या मताची, सांप्रदायाची निंदा, खंडन, घृणा करीत नाही.

**प्रश्न**—साधकाचा व्यवहार कसा असतो?

**उत्तर**—तो आपल्या स्वार्थाचा त्याग करून दुसऱ्यांचे हित करतो, आपल्या स्वतःच्या सुख-आरामाचा त्याग करून दुसऱ्यांना सुख-आराम पोहोचवितो, स्वतःच्या मान-सन्मानाचा त्याग करून दुसऱ्यांचा मान-सन्मान करतो—"**सबहि मानप्रद आपु अमानी**" (मानस ७। ३८ २), तो कोणाविषयीही वाईट भाव ठेवत नाही. जर त्याला एखाद्याचे दोष दिसले तरी तो असे मनतो की, हे दोष त्याच्या शरीरात, अंतःकरणात, स्वभावात आहेत, त्याच्या स्वमध्ये नाहीत. जसे एखाद्याच्या वस्त्राला डाग लागला तर तो स्वतः डागी होत नाही, तसेच अंतःकरण इत्यादीमध्ये दोष निर्माण झाल्यास तो स्वतः डागी होत नाही, तसेच अंतःकरण इत्यादीमध्ये दोष निर्माण झाल्यास तो स्वतः दोषी होत नाही. अशाप्रकारे साधक कोणालाही निंद्य मानीत नाही आणि तो दुसऱ्यांनाही प्रायः निंद्य राहत नाही—"**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः**" (गीता १२। १५)

**प्रश्न**—मनुष्यजीवनामध्ये साधनेचा आरंभ केव्हा होतो?

**उत्तर**—संसारात संतप्त (दुःखी) झाल्यास आणि विवेक निर्माण झाल्यास साधनेचा आरंभ होतो. जेव्हा मनुष्याला संसारापासून सुख

मिळत नाही, शांती मिळत नाही अणि तो ज्याच्याशी स्नेह करतो, ज्याच्याकडून तो सुख प्राप्त करतो अथवा सुखाची आशा ठेवतो, त्यांच्याकडूनही त्याला धक्का बसतो, तेव्हा तो संसारापासून निराश होतो. त्याच्या अंतःकरणात चल-बिचल निर्माण होते, अशा अवस्थेत त्याच्या मनामध्ये ते सुख प्राप्त करण्याची इच्छा (आवश्यकता) जागृत होते, जे नित्य असेल, अविनाशी असेल, निर्विकार असेल दुःखरहित असेल. आता मी ते सुख प्राप्त करीन ज्यामध्ये दुःख नसेल तसेच ज्याचा कधी नाश होणार नाही, ज्या पदापासून कधीही पतन होणार नाही, ते पद प्राप्त करीन. अशी वस्तू प्राप्त करील ज्याचा कधीही वियोग होणार नाही असा उद्देश होताच साधनेचा आरंभ होतो.

केवळ संसारापासून दुःखी होऊन साधनेत लागलेला माणूस तर संसारी सुख मिळाल्यास साधनेपासून परावृत्तही होऊ शकतो, परंतु विवेकपूर्वक साधनेत लागलेला मनुष्य साधनेपासून कधीही हटू शकत नाही. करण त्याचा उद्देश, ज्यामध्ये किंचितमात्रही दुःख नसेल असे सुख प्राप्त करण्याचा असतो. ते अविनाशी सुख प्राप्त केल्याशिवाय त्याला कोणत्याही देश, काल, वस्तू, व्यक्ती, अवस्था, परिस्थिती इत्यादीविषयी संतोष होत नाही.

जो संसारापासून दुःखी तर होतो, परंतु ते दुःख सांसारिक सुखाद्वारा नाहीसे करू इच्छितो, तो संसारी (भोगी) असतो, साधक होऊ शकत नाही. कारण सांसारिक सुखात आसक्त असलेल्या मनुष्याची साधनबुद्धी होऊच शकत नाही.* सांसारिक सुखाने मनुष्याची सांसारिक दुःखे कधी नाहीसे होत नाही हा नियम आहे. सांसारिक सुखाच्या पूर्वीही दुःख आहे आणि शेवटीही दुःख आहे, म्हणून मध्यातही दुःखच

---

१-भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम्।
व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते॥

(गीता २।४४)

आहे,[१] मग ते दिसो अथवा न दिसो. कारण जी वस्तु आदी आणि अंती असते, ती मध्यातही असते—असा सिद्धांत आहे. जेव्हा मनुष्य सांसारिक सुख वास्तविक दुःखरूपच आहे, ही गोष्ट समजून घेतो आणि सुखाचा भोगी दुःखापासून कधीही आपला पिंड सोडवू शकत नाही, तेव्हा साधनेला सुरुवात होते.

**प्रश्न**—साधनेचे स्वरूप काय आहे?

**उत्तर**—त्याग, विवेक आणि शरणागती (प्रार्थना) हे साधनेचे स्वरूप आहे. स्वतःच्या सुखासाठी काहीही न करता केवळ दुसऱ्याच्या सुखासाठी संपूर्ण क्रिया करणे—हा त्याग (कर्मयोग) आहे.

बालपणापासून आजपर्यंत शरीर संपूर्णपणे बदलले, पण मी तोच आहे अर्थात स्वरूप जसेच्या तसे आहे—हा विवेक (ज्ञानयोग) आहे.

मी काही करू शकत नाही—या भावनेने आपल्या बलाच्या आश्रयाचा त्याग करून भगवंताचा आश्रय घेणे[२]—ही शरणागती (भक्तियोग) आहे.

**प्रश्न**—साधनेत मुख्य बाधा कोणती आहे?

**उत्तर**—संयोगजन्य सुखाची आसक्ती हीच साधनेत मुख्य बाधा आहे. ही बाधा साधनेत फार कालपर्यंत राहते. साधक ज्यापासून सुख घेतो तेथे तो अटकतो. येथपर्यंत की, तो समाधीचे जरी सुख घेत असेल तरीही तो अटकतो. तेथे[३] सात्त्विक सुखाची आसक्तीसुद्धा

---

१-(१) ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते।

(२) परिणामतापसंस्कारदुःखैर्गुणवृत्तिविरोधाच्च दुःखमेव सर्वं विवेकिनः। (योगदर्शन २।१५),''परिणामदुःख, तापदुःख आणि संस्कारदुःख—असे तीन प्रकारचे दुःख सर्वांच्या ठिकाणी असल्याकारणाने तसेच तिन्ही गुणांच्या वृत्तीमध्ये परस्पर विरोध असल्याकारणाने विवेकी पुरुषासाठी सर्वचे सर्व भोग दुःखरूपच आहेत.

२-हौं हार्‍यो करि जतन बिबिध बिधि अतिसै प्रबल अजै।
तुलसिदास बस होइ तबहिं जब प्रेरक प्रभु बरजै॥
(विनय० ८९।४)

३-भोगांचे सुख संयोगजजन्य अणि समाधीचे सुख वियोगजन्य आहे. संयोगजन्य सुख घेतल्याने पतन होते आणि वियोगजन्य सुख घेतल्याने साधक अडकला जातो.

बंधनकारक असते—"**सुखसङ्गेन बध्नाति**" (गीता १४।६). म्हणून भगवंतांनी संयोगजन्य सुखाच्या कामनेला विवेकी साधकांचा नित्य वैरी म्हटले आहे—"**ज्ञानिनो नित्यवैरिणा**" (गीता ३।३९)

आजकाल साधकात आपल्या साधनेची प्रगती व्हावी आणि अधिकात अधिक ज्ञान प्राप्त करण्याची जिज्ञासा तर राहते, परंतु सुखासक्ती नष्ट करण्याचा प्रयत्न केला जात नाही. सुखासक्तीमुळेच साधन तात्काल अर्थात वर्तमानकालात सिद्ध होत नाही आणि विलंबाने सिद्ध होते. म्हणून सुखासक्ती नाहीशी करण्याची फार मोठी आवश्यकता आहे.

वास्तविक पाहिले तर भगवानसुद्धा विद्यमान आहेत, गुरूसुद्धा विद्यमान आहेत, तत्त्वज्ञानसुद्धा विद्यमान आहे आणि आपल्या ठिकाणी योग्यता, सामर्थ्यसुद्धा विद्यमान आहे. केवळ नाशवान सुखासक्ती-मुळेच त्यांच्या प्रकट होण्यात बाधा येत आहे. नाशवान सुखाची आसक्ती नाहीशी करण्याची जबाबदारी साधकावर आहे कारण त्यानेच आसक्ती केली आहे.

म्हणून भगवंतांनी म्हटले आहे—

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत्।**
**आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः॥**

(गीता ६।५)

"आपल्याद्वारा आपला उद्धार करावा, आपले पतन करू नये, कारण आपणच आपले मित्र आहोत आणि आपणच आपले शत्रू आहोत."

**प्रश्न**—संयोगजन्य सुखाची आसक्ती कशी सुटेल?

**उत्तर**—दुसऱ्याच्या सुखाने सुखी (प्रसन्न) आणि दुःखाने दुःखी होणे हा सुखासक्ती सुटण्याचा उत्कृष्ट उपाय आहे—"**पर दुख दुख सुख सुख देखे पर**" (मानस ७।३८।१). सुखी व्यक्तीला पाहून प्रसन्न होण्याने साधक त्याच्या सुखात सहमत होतो, ज्यामुळे

ती व्यक्ती सुखाचा अनुभव करते, तसेच दुःखी व्यक्तीला पाहून कारूणित होण्याने साधक त्याच्या दुःखात सहमत होतो, ज्यामुळे दुःखाचा भार एकट्या त्या व्यक्तीवर राहत नाही, त्याचे दुःख वाटले जाते आणि तो सुखाचा अनुभव करतो.

दुसऱ्याच्या सुखाने सुखी झाल्यास भोगेच्छा कमी होते, कारण भोगामाध्ये जे सुख मिळते, ते सुख साधकाला दुसऱ्याला सुखी पाहण्याने विशेषतेने मिळते, ज्यामुळे सुखभोगाची आवश्यकता राहत नाही. त्याचप्रमाणे दुसऱ्याच्या दुःखाने दुःखी झाल्यास साधकाजवळ जी सुख-सामग्री योग्यता, सामर्थ्य इत्यादी आहेत, ती स्वाभाविकपणे त्याचे दुःख दूर करण्यास लावली जाते, ज्यामुळे संग्रह करण्याची इच्छा कमी होते. अशाप्रकारे दुसऱ्याच्या सुखाने सुखी आणि दुःखाने दुःखी झाल्यास संयोगजन्य सुखाची (भोग आणि संग्रहाची) आसक्ती कमी कमी होऊन नष्ट होते.

दुसऱ्याचा सुखाने सुखी आणि दुःखाने दुःखी होणारा साधक स्वतःचे दुःख तर प्रसन्नतेने सहन करतो, परंतु दुसऱ्याचे दुःख त्याला सहन होत नाही. त्याला आपल्या दुःखाची पर्वा राहत नाही परंतु दुसऱ्याच्या दुःखाची पर्वा राहते. जर साधकाचे ठिकाणी त्याग-वैराग्याची प्रधानता असेल तर त्याला स्वतःच्या शरीराचे दुःख फार कमी वाटते आणि दुसऱ्याकडून सुख प्राप्त करण्याची इच्छा राहत नाही. दुसऱ्याकडून सुख मिळविणे त्याला आवडत नाही आणि दुसरा सहजासहजी सुख देऊ लागला तर हा प्रसन्न होत नाही.

**प्रश्न**—सुखासक्ती सोडण्याचे इतर उपाय कोणते आहेत?

**उत्तर**—जर भगवंताचे ठिकाणी दृढ आस्तिक भाव असेल तर व्याकुळतापूर्वक भगवंतांना आर्ततेने प्रार्थना केल्यानेसुद्धा सुखासक्ती सुटू शकते.

मला सुख घ्यावयाचेच नाही असा जर दृढ निश्चय झाला तर सुखासक्ती नाहीशी होण्यास विलंब लागत नाही. वास्तविक सुख

घेण्यासाठी नाहीच, हे तर केवळ देण्यासाठीच आहे—"**एहि तन कर फल विषय न भाई**" (मानस ७।४४।१).

ज्या महापुरुषांची सांसारिक सुखात असक्ती नाही, तर केवळ भगवंतात आसक्ती (प्रियता) आहे, त्यांचा संग केल्याने सुखाची आसक्ती नाहीशी होते. संग करण्याचे तात्पर्य, महापुरुषांचे भाव, मान्यता, आचरण इत्यादी विषयी महत्त्वबुद्धी असणे, हे आहे.

सखोल विवेक केल्यानेही सुखासक्ती नाहीशी होते. जसे—संसाराचे सुख कधी पूर्ण मिळत नाही, तर अर्धवटच मिळते, आपणाला धन मिळाले तर आपल्यापेक्षा अधिक धन कोणाजवळ नाही काय? पत्नीचे सुख मिळाले तर त्यापेक्षा अधिक गुणवती, सुंदर पत्नी कोणाची नाही काय? आपणाला जी काही वस्तू मिळाली आहे त्यापेक्षा उत्तम वस्तू संसारात आहेच. जर आपणाला उत्तमाती उत्तम वस्तू जरी मिळाली तरीही तिचा वियोग अवश्यंभावी आहे. मग अशा सुखामध्ये आपण कशाला आसक्त व्हावे?

संयोगजन्य सुखाची आसक्ती संपूर्ण पाप, संताप, दुःख, अनर्थ, कलह, चल-बिचल, बाधा इत्यादीचे मूळ आहे—असे समजून अनुभव केल्याने सुखासक्ती नाहीशी होते.

**प्रश्न**—काम-क्रोधादी दोष निर्माण झाले तर साधकाने काय करावे?

**उत्तर**—दोष माझ्यात निरंतर राहत नाहीत असे त्याने मानावे, दोष तर येतात आणि जातात, परंतु मी तर तोच राहतो. जसे एखाद्या घरात कुत्रा आला आणि गेला तर घरही कुत्र्याचे झाले नाही आणि कुत्राही घरचा झाला नाही. तसेच दोष आले आणि गेले, तर मीही त्या दोषांचा साथीदार नाही आणि ते दोषही माझे साथीदार नाहीत, असे मानून साधकाने त्या दोषांना वश होऊ नये—"**तयोर्न वशमागच्छेत्**" (गीता ३।३४) अर्थात त्यानुसार क्रिया करू नये, कामादी दोष त्यालाच त्रास देतात, जो त्यांना वशीभूत होतो. म्हणून जेव्हा केव्हा हे दोष निर्माण होतील, तेव्हा

साधकाने "हे नाथ, हे नाथ" म्हणून भगवंताना आर्ततेने प्रार्थना करावी. शुद्ध हृदयाने केलेली प्रार्थना कधीही निष्फल होत नाही.

**प्रश्न**—साधन प्रगतीपथावर आहे हे कसे ओळखावे?

**उत्तर**—साधकाचे संसाराविषयी जितके कमी आकर्षण असेल आणि भगवंताविषयी जितके अधिक आकर्षण असेल, तितकेच तो साधनेत प्रगतीपथावर आहे असे समजावे. साधनेत प्रगती होत असल्यास राग-द्वेष उत्तरोत्तर कमी होतात. जर पूर्वीपेक्षा राग-द्वेष, हर्ष-शोक इत्यादी कमी झाले नाहीत, चित्तात शांती निर्माण झाली नाही, तर मग साधन कुठे झाले?

**प्रश्न**—साधन पूर्ण (सिद्ध) झाल्यावर काय होतय?

**उत्तर**—साधन सिद्ध झाल्यास कृतकृत्यता, ज्ञातज्ञातव्यता, तसेच प्राप्तप्राप्तव्यता होते अर्थात काहीही करणे, जाणणे आणि मिळविणे शिल्लक राहत नाही. साधकाला अशा परम लाभाची प्राप्ती होते जिची प्राप्ती झाल्यास त्यापेक्षा अधिक लाभ त्याच्या मान्यतेत राहत नाही आणि ज्यात स्थित झाल्यास तो भयंकरातीभयंकर दुःखानेही कधी विचलित केला जाऊ शकत नाही.*

सिद्धावस्था झाल्यास आपल्या ठिकाणी अभाव तर राहत नाही आणि विशेषता दिसत नाही. जोपर्यंत साधकाला आपल्यात विशेषता दिसते, तो स्वतःला सिद्ध मानतो, तोपर्यंत त्याच्यात व्यष्टी अहंकार (व्यक्तित्त्व) राहते. जोपर्यंत व्यष्टी अहंकार राहतो, तोपर्यंत परिच्छिन्नता, विषमता, जडता, अभाव, अशांती, कर्तृत्व, भोक्तृत्व, इत्यादी दोष विद्यमान राहतात.

**प्रश्न**—श्रेष्ठ साधक आणि सिद्ध यांच्यात काय फरक असतो?

**उत्तर**—साधनेची उच्च स्थिती प्राप्त झाल्यावर जागृत-अवस्थेत

---

* यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः।
यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते॥
(गीता ६।२२)

तर साधकात जड-चेतनाचा विवेक उत्तम प्रकारे राहतो, परंतु निद्रावस्थेत त्याची विस्मृती होते. म्हणून झोपेतून जागे झाल्यावर तो साधक या विवेकाला पकडतो. परंतु सिद्धाचा विवेक प्रत्येक अवस्थेत, नित्य-निरंतर, स्वतः स्वाभाविक राहतो. झोपेतून जागे झाल्यावर त्याला विवेकाला पकडावे लागत नाही.

उच्च साधक आणि सिद्धाची ओळख दुसरा व्यक्ती करू शकत नाही, कारण ती स्थिती स्वसंवेद्य आहे.

**प्रश्न**—तत्त्वज्ञ आणि तत्त्वनिष्ठा यांच्यात काय फरक आहे ?

**उत्तर**—तत्त्वज्ञात थोडीशी कोमलता राहते आणि तत्त्वनिष्ठा दृढ राहते, तत्त्वज्ञाचा व्यवहार पाण्यात ओढलेल्या रेषेसारखा आणि तत्त्वनिष्ठाचा व्यवहार आकाशात ओढेलेल्या रेषेसारखा असतो. तात्पर्य तत्त्वज्ञात तर पूर्वीचा काही संस्कार (स्वभाव) राहतो, परंतु तत्त्वनिष्ठात पूर्वीचा संस्कार काहीही राहत नाही, तर त्यात अंतःकरणसहित संपूर्ण संसाराचा अत्यंत अभाव तसेच परमात्मतत्त्वाचा दृढ भाव निरंतर जसाच्या तसा स्वतः स्वाभाविक जागृत राहतो.

तत्त्वज्ञान झाल्यावरही तत्त्वनिष्ठा होण्यात काही समय लागू शकतो. परंतु त्यासाठी कोणता अभ्यास अथवा उद्योग करावा लागत नाही, तर समय येताच आपोआप निष्ठा होते. जसे काटा काढल्यानंतरसुद्धा त्रास राहतो, परंतु तो त्रास काही कालानंतर आपोआप नाहीसा होतो. विस्तवावर पाणी टाकल्यास विस्तव विझून जातो परंतु राखेत उष्णता राहते. ती उष्णता काही कालानंतर आपोआप नाहीशी होते. वृक्षाचे मूळ तोडल्यानंतरही त्याच्या फांद्यावर असलेली पाने हिरवी दिसतात, परंतु थोड्या कालानंतर ती पाने सुकून जातात. झोपेतून जागे झाल्यावर-ही काही काळ डोळ्यामध्ये जडता राहते, परंतु थोड्या वेळानंतर ती जडता नाहीशी होते. तात्पर्य तत्त्वज्ञ काही काळानंतर आपोआप तत्त्वनिष्ठ होतो.



# ७. मनाची चंचलता कशी नाहीशी होईल ?

आजकाल ही फर मोठी तक्रार असते की, मन लागत नाही, मन फार चंचल आहे, म्हणून मनाला आवरण्यासाठी, मनाची चंचलता नाहीशी करण्यासाठी एक फार मोठा उत्तम उपाय सांगितला जातो.

आपण अभ्यास करा की, मनात काय येते? मनात विशेष करून पूर्वी घडलेल्या गोष्टी आठवतात, घडलेल्या गोष्टी मग बालपणीच्या असो अथवा एका क्षणापूर्वीच्या असो, तो सर्व भूतकाळ आहे. भूतकाळात ज्या गोष्टी ऐकल्या, पाहिल्या वाचल्या, विचारात आल्या त्या गोष्टी आठवतात. त्याचप्रमाणे काही भविष्यातील गोष्टीही आठवतात की, आपणाला अमुक काम करावयाचे आहे, अमुक ठिकाणी जावयाचे आहे, अमुकाला भेटावयचो आहे, एवढा धंदा करावयाचा आहे इत्यादी. अशाप्रकारे भूतकालाच्या आणि भविष्यकालाच्या गोष्टी आठवतात. या चिंतनाला नष्ट करण्यासाठी पुष्कळ प्रकारच्या युक्ती आणि उपाय आहेत. त्यापैकी सर्वात उत्कृष्ट उपाय आहे, मनात जे काही आठवले ते आता नाहीच असे समजून त्याची उपेक्षा करावी आणि त्याविषयी तटस्थ अर्थात वर्तमानात त्याचा आपला संबंध नाहीच असा दृढ विचार करावा. ही शिकण्याची गोष्ट नव्हे तर अनुभव करण्याची गोष्ट आहे.

भूतकाळाचा संपूर्णपणे अभाव अहे. जसे त्या काळाचा अभाव आहे, तसे त्या काळाच्या (घडलेल्या) घटनांचाही अभाव आहे. घडलेल्या घटनेत दोन प्रकारच्या गोष्टी आहेत. एक आपण भोगांना भोगले आणि दुसरे आपण सहजच पाहिले, ऐकले वाचले आणि सोडून दिले. म्हणून मनोराज्याचे दोन प्रकार सांगितले गेले आहेत— मंद आणि तीव्र. भोगले नसलेल्या भोगांची जी आठवण येते, ते मंद

मनोराज्य आहे आणि भोगलेल्या भोगांची जी आठवण येते ते तीव्र मनोराज्य आहे. भोग जितक्या आसक्तीने भोगला आहे, तितकेच त्याचे स्मरण अधिक होते आणि लवकर नाहीसे होत नाही.* मधुसूदनाचार्यांच्या "भक्तिरसायन" ग्रंथामध्ये आले आहे—

**कामक्रोधभयस्नेहहर्षशोकदयाऽऽदयः ।**
**तापकाश्चित्तजतुनस्तच्छान्तौ कठिनं तु तत्॥**

(१।५)

"काम, क्रोध, भय, स्नेह, हर्ष, शोक, दया इत्यादी भाव चित्तरूपी लाखेला तापवून द्रवित करणाऱ्या आहेत. भावरूपी उष्णता शांत झाल्यास चित्तरूपी लाख जशीच्या तशी कठोर होते."

लाख कठोर असते, परंतु तापक द्रव्याचा संग झाल्यास ती द्रवित होते, मेणही थोडीशी उष्णता लागताच द्रवित होते. जर मेणावर रंग लावून दाबले तर तो रंग त्यावर बसतो, परंतु नखाने काढल्यास तो रंग निघून जातो, जर एखाद्या पातेल्यात मेण टाकून त्यात रंग घालून त्याला तापवले तर तो रंग मेणात पूर्णपणे मिसळतो. मेण थंड झाल्यावर मेण टाकलेल्या रंगाचेच होते. त्याचप्रमाणे ज्या भोगांच्या भोगण्यात,

---

* सांसारिक भोगांना बाहेरूनही आणि मनानेही भोगले जाऊ शकते. बाहेरून भोग भोगणे आणि मनाने त्याचा चिंतनाचा रस (सुख) घेणे—दोन्हीत काहीही फरक नाही. बाहेरून आसक्तिपूर्वक भोग भोगल्याने जसा संस्कार होतो, तसाच संस्कार मनाने भोग भोगल्याने अर्थात मनाने भोगाच्या चिंतनाचा रस घेण्याने होतो. भोगाची आठवण आल्यास त्याच्या स्मरणापासून रस घ्याल तर कितीही वर्षे मागे पडली तरीही ते भोग जसेच्या तसे (ताजे) कायम राहतात. म्हणून भोगाच्या चिंतनानेसुद्धा एक नवीन भोग तयार होतो. एवढेच नव्हे, मनाने भोगांच्या चिंतनाचे सुख घेतल्याने विशेष हानी होते. लोकलज्जा आणि उलट-सुलट व्यवहार होण्याच्या भीतीने मनुष्य बाहेरून तर भोगांचा त्याग करू शकतो, परंतु मनाने भोग भोगल्याने बाहेरून कोणतीही बाधा येत नाही. म्हणून मनाने भोग भोगण्याचा विशेष अवसर प्राप्त होतो.

ज्या घटनेमध्ये आपले चित्त अधिक द्रवित झाले आहे, त्यात आपण अधिक तल्लीन झालो आहोत, त्यांचा रंग आपल्या मनात बसलेला असतो, म्हणून त्यांची अधिक आठवण येते. भूतकालात आपण जो भोग भोगला आहे, तो आता मुळीच नाही परंतु तो द्रवित झालेल्या चित्तात बसला आहे, म्हणून तो तीव्र गतीने येतो. रागपूर्वक, असक्तीपूर्वक भोगलेला भोग कित्येक वर्षे मागे पडली तरीही जसाच्या तसा दिसतो. जसाच्या तसा दिसत असला तरीही भूतकालामधीलच आहे, आता तर तो नाहीच. त्याला हटविण्याची ही फार महत्वाची युक्ती आहे. म्हणून तुम्ही हा भोग आत्ता नाही याचा अनुभव करा. ती घटना आत्ता नाही, ही तर निश्चित आणि शंकारहित गोष्ट आहे. आपण त्या घटना इत्यादींना नाहीसे करू इच्छितो, चित्ताला ठीक करू इच्छितो. परंतु या घटना इत्यादींना मिटविल्याने त्या मिटणार नाहीत. चित्ताला ठीक केल्याने ते ठीक होणार नाही. त्याला मिटविण्याचा, ठीक करण्याचा प्रयत्न करणे म्हणजे त्याला सत्ता देऊन दृढ करणे आहे. वास्तविक या घटना आत्ता नाहीतच. जर त्या घटना नाहीतच तर मग चंचलता कशाची? जे नाही, त्यासाठी आपण दुःखी होत आहोत, किती आश्चर्याची गोष्ट आहे? ज्याचा अभाव आहे त्यापासून आपण भयभीत आहोत.

काम, क्रोध, भय, स्नेह, हर्ष, शोक, राग, द्वेष आणि दया—या नऊ गोष्टी आहेत, ज्यापासून चित्त द्रवित होते (या सर्वात मुख्य राग-द्वेष आहेत). कामनेने एखादा भोग भोगत असाल, तर कामना जितकी तीव्र असेल, तितकेच अधिक चित्त द्रवित होते आणि तितकाच तो भोग अधिक आठवतो. क्रोध तीव्र असेल तर चित्त अधिक द्रवित होते. एखाद्यावेळी एखाद्या कारणाने भयंकर भीती वाटली असेल तर ते भयसुद्धा अंतःकरणात कायम राहते, लवकर निघत नाही. त्याचप्रमाणे एखाद्याविषयी अधिक प्रीती असेल तर चित्त द्रवित होते. मित्राच्या भेटीने फार मोठा हर्ष होतो, तर त्यावेळीही चित्त द्रवित होते.

एखाद्याचा अंत होतो आणि त्याचा फार मोठा शोक होतो, तर तो चितात घर करून बसतो. थोडा शोक असेल तर थोडाच बसतो. एखाद्याकडे पाहून दया उपजली तर तीही चित्तात जाऊन बसते परंतु "आत्ता ती नाही" ही गोष्ट अगदी निश्चित आहे.

कुत्र्याच्या शरीरामध्ये एखादी जखम झाली असेल तर तो ती जखम जीभेने चाटत असतो. त्याच्या जीभेच्या लाळेत एक शक्ती असते, तीच्यामुळे ती जखम नाहीशी होते. परंतु वानराच्या शरीरामध्ये जखम झाली तर तो त्याला वारंवार कोरीत राहतो, ज्यामुळे ती जखम बरी होत नाही. त्याचप्रमाणे दोन प्रकारच्या गोष्टी आहेत—चाटणे आणि कोरणे. आत्ता नाही—हे चाटणे आहे आणि वारंवार स्मरण करणे आणि त्याला नाहीसे करण्यासाठी वारंवार प्रयत्न करणे कोरणे आहे. जसे एखाद्याचा मुलगा वारला तर तो फार चांगला होता पण मेला म्हणून त्याचे वारंवार स्मरण करतो, त्याला स्मरण नसले तरी लोक येऊन त्याला स्मरण करून देतात. प्राय: स्त्रिया स्मरण करून देतात. स्त्रीया येतात आणि मुलगा माझ्या मांडीवर बसत होता, अशा प्रकारे मला तो चिकटत होता असे म्हणतात. तो असा होता, त्याचे रूप असे होते, असा तो चंचल होता. ह्या गोष्टीने अंत:करणाची जखम ओली होते, दु:ख अधिक वाढते, शोक अधिक होतो अणि मुलाची आठवण अधिक प्रमाणात येऊ लागते. त्याचप्रमाणे काम, क्रोध, भय इत्यादीविषयी स्मरण करणे जखमेला वाढवणे आहे. तिला चाटून साफ करून टाका की, कितीही काम, क्रोध, लोभ झाला, मोह, आसक्ती झाली, कसाही भोग भोगला, तो वास्तविक त्यावेळीही नव्हता, आत्ता तर नाहीच "**नासतो विद्यते भाव:**" ज्या व्यक्तीत आपला स्नेह होता, मोह होता, मित्रता होती ते मेले अथवा वेगळे झाले. ते कुठेतरी राहतात, आपण कुठेतरी राहतो. आता तर त्या व्यक्ती नाही, तो देश नाहीत, तो काळ नाही, ती अवस्था नाही, ती परिस्थिती नाही, त्यांचा जेवढ्या दृढतेने अभाव मानू शकाल तेवढा

माना आणि त्यांची उपेक्षा करा. त्यांच्याशी राग-द्वेष करू नका, तर तटस्थ व्हा.

**प्रश्न**—भूतकाळ आणि भविष्यकाळ आत्ता नसतो, पण वर्तमान काळ तर आत्ता आहेच?

**उत्तर**—वास्तविक पाहिले तर वर्तमानकाळ नाहीच. भूत आणि भविष्यकाळाच्या संधीलाच वर्तमानकाळ म्हटले जाते. पाणिनि व्याकरणाचे एक सूत्र आहे—"**वर्तमानसामीप्ये वर्तमानवद्वा**"—(३।३।१३१) अर्थात वर्तमानसामीप्यसुद्धा वर्तमानासारखेच असते. जसे भूतकाळाच्या अनुषांगाने म्हटले जाते की "मी आत्ता आलो आहे" आणि भविष्यकाळाच्या दृष्टीकोनातून असे म्हटले जाते की "मी आत्ता जात आहे". हे वर्तमनासामीप्य आहे. वास्तविक वर्तमानसामीप्यालाच वर्तमानकाळ म्हटले. जर वर्तमानकाळ वास्तविक असता तर तो कधीही भूतकाळात परिणत झाला नसता.

वास्तविक देश, काल इत्यादी वर्तमान नाहीत, तर तत्त्वच (सत्ता) वर्तमान आहे. तात्पर्य जे प्रतिक्षण बदलत आहे ते वर्तमान नाही, तर जे कधीही बदलत नाही ते वर्तमान आहे. ते तत्त्व भूत, भविष्य आणि वर्तमान काहीही नाही. काळात सत्ता आहे पण सत्तेत काळ नाही. सत्ता काळातीत आहे.

सर्वांचे वर्तमान (सत्ता, स्वरूप) नेहमीच निर्दोष आणि शांत आहे. म्हणून भूत भविष्य आणि वर्तमान—तिन्ही काळांचा त्याग करून त्याच निर्दोष आणि शांत असलेल्या सत्तेत स्थित व्हावयाचे आहे अर्थात त्यात आपल्या स्वत:सिद्ध स्थितीचा अनुभव करावयाचा आहे. अनुभव झाल्यावर मनही राहणार नाही आणि मनाची चंचलताही राहणार नाही, तर केवळ सत्ता राहील.



# ८. मृत्यूच्या भयापासून बचाव कसा करावा?

संसाराच्या संपूर्ण दुःखाच्या मुळात सुखाची इच्छा आहे. सुखेच्छे-शिवाय कोणतेही दुःख होतच नाही. असे व्हावे आणि असे होऊ नये-या इच्छेतच संपूर्ण दुःख आहे. मृत्युसमयी जे भयंकर कष्ट होतात, ते देखील त्याच मनुष्याला होतात, ज्याला जगण्याची इच्छा आहे, कारण तो अजून जगू इच्छितो आणि मरावे तर लागत आहे. जर जगण्याची इच्छा नसेल तर मृत्यूसमयी कोणतेही कष्ट होत नाहीत. जसे बाल्यातून तारुण्यात आणि तारुण्यातून वृद्ध झाल्यास अर्थात बालपण आणि तारुण्य समाप्त होताना कोणतेही कष्ट होत नाहीत, तसेच शरीर सुटत असताना कोणतेही कष्ट होत नाहीत. गीतेत असा विषय आला आहे—

**देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा।**
**तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति॥**

(२।१३)

"मनुष्यशरीरमध्ये जसे बालपण, तरुणपण आणि वृद्धावस्था होत असते, तसेच देहांतराची प्राप्ती होते. त्या विषयात धीर मनुष्य मोहित होत नाही."

**वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही॥**

(२।२२)

"मनुष्य जसे जुन्या वस्त्रांचा त्याग करून नवी वस्त्रे परिधान करतो, तसेच देही जुने शरीर सोडून नव्या शरीरात जातो.

शरीराविषयी अध्यास अर्थात मीपणा आणि माझेपणा असल्यानेच

जगण्याची इच्छा आणि मृत्यूचे भय वाटत असते. कारण शरीर तर नाशवान आहे, परंतु आत्मा अमर (अविनाशी) आहे आणि याचा विनाश कोणी करूच शकत नाही—"**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति**" (गीता २।१७), "**न हन्यते हन्यमाने शरीरे**" (गीता २।२०)

**राम मरे तो मैं मरूँ, नाहि तो मरे बलाय।**
**अविनाशी का बालका, मरे न मारा जाय॥**

शरीर प्रत्येक क्षणाला मरत आहे, एक क्षणसुद्धा टिकत नाही आणि आत्मा नित्य-निरंतर जसाच्या तसा राहतो, एक क्षणसुद्धा बदलत नाही. म्हणून जगण्याची इच्छा आणि मृत्यूचे भय शरीरलाही होत नाही आणि आत्म्यालाही होत नाही, तर त्याला होते, ज्याने स्व अविनाशी असताना-सुद्धा नाशवान शरीराला आपले स्वरूप (मी आणि माझे) मानले आहे. शरीराला आपले स्वरूप समजणे अविवेक आहे, प्रमाद आहे आणि प्रमादच मूत्यू—"**प्रमादो वै मृत्युः**" (महाभारत उद्योग० ४२।४).

प्रकृतीमध्ये स्थित असलेला मनुष्यच सुख दुःखाचा भोक्ता बनतो—"**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान्गुणान्**" (गीता १३।२१) पुरुष प्रकृतीत अविवेकाने स्थित असतो. स्वरूपाला शरीर आणि शरीराला आपले स्वरूप समजणे अविवेक आहे. हा अविवेकच दुःखाला जाणू इच्छित नाही, या कारणामुळे दुःख होते. जर त्याने नाशवानाला आपले स्वरूप समजले नाही आणि स्वरूपाला योग्य प्रकारे जाणून घेतले तर मग दुःख होणार नाही.

शरीराविषयी जेवढा अधिक मीपणा आणि माझेपणा असतो, मृत्यूसमयी तितकेच अधिक कष्ट होतात. संसारात पुष्कळ माणसे मरत राहतात, परंतु त्यांच्या मरण्याचे दुःख, कष्ट आपणाला होत नाहीत, कारण त्यात आपला मीपणाही नाही आणि माझेपणाही नाही.

मृत्यूसमयी एक पीडा होते आणि एक दुःख होते, पीडा शरीराला

आणि दु:ख मनाला होते. ज्या मनुष्याचे ठिकाणी वैराग्य बाणलेले असते, त्याला पीडेचा अनुभव तर येतो, परंतु दु:ख होत नाही. मात्र देहाविषयी आसक्ती असलेल्या मनुष्याला पीडेचा जसा भयंकर अनुभव येतो, तसा अनुभव वैराग्यवान मनुष्याला येत नाही. परंतु ज्याला बोध आणि प्रेमाची प्राप्ती झाली आहे, त्या तत्त्वज्ञ, जीवन्मुक्त तसेच भगवत्प्रेमी महापुरुषाला पीडेचाही अनुभव येत नाही. जसे भगवंताच्या चरणी प्रेम असल्याने वालीला मृत्यू समयी कोणत्याही पीडेचा आणि कष्टाचा अनुभव आला नाही. जसे हत्तीच्या गळ्यात असलेली माळ तुटून पडली तर हत्तीला त्याचा पत्ताही लागत नाही, तसेच वालीला शरीर समाप्त झाल्याचा पत्ता लागला नाही.

**राम चरन दृढ़ प्रीति करि बालि कीन्ह तनु त्याग।**
**सुमन माल जिमि कंठ ते गिरत न जानइ नाग॥**

(मानस ४।१०)

मुनष्याला बोध झाल्यास सच्चिदानंदरूप तत्त्वामध्ये आपल्या स्वाभाविक स्थितीचा अनुभव येतो, ज्या तत्त्वात कधीही परिवर्तन झाले नाही, होत नाही, होणार नाही आणि होऊ शकत नाही, प्रेमाची प्राप्ती झाल्यावर मनुष्याला एक विलक्षण रसाचा अनुभव येतो, कारण प्रेम प्रतिक्षण वर्धमान असते.

बोध आणि प्रेमाची प्राप्ती झाल्यावर मृत्यूतसुद्धा आनंदाचा अनुभव येतो. कारण मृत्यूसमयी तत्त्वज्ञ पुरुष एका शरीरात आबद्ध न राहाता सर्वव्यापी होतो आणि भगवत्प्रेमी पुरुष भगवंताच्या लोकात, भगवंताची सेवा करण्यासाठी जातो.

ज्यांचा शरीराविषयी मी आणि माझेपणा नष्ट झाला नाही, त्यांनाही मृत्यु समयी, कष्टात सुखाचा अनुभव येऊ शकतो. जसे शूरवीर सैनिकात वीररसाचा स्थायीभाव ''उत्साह'' राहत असल्यामुळे शरीराला त्रास होत असला तरीही त्याला दु:ख होत नाही, तर आपले कर्तव्य पालन करण्याचे एक सुख होत असते. त्याचे ठिकाणी एवढा उत्साह

राहत असतो की, शिर कापले गेले तरीही तो धडाने शत्रूबरोबर युद्ध करीत असतो, खुदीराम बोस यांना जेव्हा फाशीचा हुकूम झाला होता, तेव्हा आपल्या उद्देशाची सिद्धी झाल्याच्या प्रसन्नतेने त्यांच्या शरीराचे वजन वाढले होते. स्त्रीला प्रसवकाळी भयंकर कष्ट होतात, परंतु पुत्र मोहामुळे तिला दुःख होत नाही, तर एक प्रकारचे सुख होते, ज्याच्या तुलनेत प्रसुतीचे कष्टसुद्धा नगण्य होतात. लोभी माणसाला पैसा खर्च होताना फार कष्ट होतात, परंतु ज्या कामात अधिक लाभ होण्याची शक्यता असते, त्यावेळी तो जवळचे पैसेही त्यात लावतो आणि आवश्यक वाटल्यास अधिक व्याजाने घेऊनही पैसा त्यात गुंतवितो. लाभाच्या आशेने पैसा गुंतविण्यातही त्याला दुःख होत नाही. तपस्वीलोक गर्मीच्या दिवसात पंचाग्नी तप सुरू करतात, त्यावेळी त्यांच्या शरीराला कष्ट झाले तरीही त्यांना दुःख होत नाही, उलट तपश्चर्येचा उद्देश असल्याने प्रसन्नता राहते.

विरक्त पुरुषाजवळ स्त्री, पुरुष, धन, घर इत्यादी काही नसतानाही त्याला अभावरूपाने अनुभव येत नाही. म्हणून त्याला दुःख होत नाही उलट सुखाचा अनुभव येतो. एवढेच नव्हे मोठ-मोठे धनी, राजा-महाराजासुद्धा त्याच्याजवळ जाऊन सुख शांतीचा अनुभव करतात. अशाप्रकारे जर शरीराविषयी असलेला मी-माझेपणा नष्ट होण्यापूर्वीसुद्धा मृत्यूसमयी, कष्ट होत असतांना सुखाचा अनुभव येऊ शकतो, तर मग ज्यांचा शरीराविषयी मी-माझेपणा संपूर्णपणे नष्ट झाला आहे, त्यांना मृत्यूसमयी दुःख होईलच कसे? निर्मम-निरहंकार झाल्यास दुःखाचा भोक्ताच कोणी राहत नाही, मग दुःख भोगेलच कोण?

जर अंतःकरणात कोणतीही इच्छा नसेल तर सांसारिक वस्तूंच्या प्राप्तीने सुख होत नाही आणि अप्राप्ती तसेच विनाशाने दुःख होत नाही. इच्छा असल्यानेच सुख आणि दुःख दोन्ही होतात. सुख आणि दुःख द्वन्द्व आहे, ज्यामुळे माणूस संसारात बांधला जातो. वास्तविक सुख आणि दुःख—दोन्ही एकच आहेत. सुखही वास्तविक दुःखाचेच नाव

आहे, कारण सुख दुःखाचे मूळ आहे—"**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते**" (गीता ५।२२). जर मनुष्याचे ठिकाणी कोणतीही इच्छा नसेल तर तो सुख आणि दुःख—दोन्हीच्या पलीकडे जातो आणि आनंदाला प्राप्त होतो. जसे सूर्याचे ठिकाणी दिवसही नाही आणि रात्रही नाही, उलट नित्य प्रकाश आहे, तसेच आनंदात सुखही नाही आणि दुःखही नाही तर नित्य आनंद आहे. त्या आनंदाचा एकदा का अनुभव आला तर मग त्याचा कधीही अभाव होत नाही, कारण तो अनुभव स्वतःसिद्ध, नित्य आणि निर्विकार आहे.

जर सर्व इच्छांची पूर्ती शक्य झाली असती तर आपण जगण्याची इच्छा पूर्ण करण्याचा प्रयत्न केला असता आणि जर मृत्युपासून बचाव करणे शक्य झाले असते तर आपण मृत्यूपासून वाचण्याचा प्रयत्न केला असता. परंतु हा सर्वांचा अनुभव आहे की, सर्व इच्छा कधीही कोणत्याही पूर्ण होत नाहीत आणि उत्पन्न होणारा कोणताही प्राणी मृत्युपासून आपला बचाव करू शकत नाही, तर मग जगण्याची इच्छा ठेवल्याने वारंवार जन्म आणि मृत्यू होत राहील तसेच जगण्याची इच्छाही कायम राहील. म्हणून जीवंतपणीच अमर होण्यासाठी इच्छेचा त्याग करणे आवश्यक आहे.

शरीर "मी" नाही कारण शरीर प्रत्येक क्षणाला बदलत राहते, परंतु आपण (स्व) तेच राहतो. जर आपण तेच राहत नसतो तर मग शरीर बदलण्याचे ज्ञान कोणाला झाले असते? बदलणाऱ्याचे ज्ञान न बदलणाऱ्यालाच होते. शरीर "माझे" ही नाही कारण त्यावर आपला अधिकार चालत नाही अर्थात याला आपण आपल्या इच्छेनुसार ठेवू शकत नाही, यामध्ये इच्छेनुसार परिवर्तन करू शकत नाही आणि याला नेहमी आपल्याबरोबर ठेवू शकत नाही. अशाप्रकारे जर आपण शरीराला "मी" आणि "माझे" मानले नाही, तर त्याच्या जगण्याची इच्छाही रहणार नाही. जगण्याची इच्छा राहिली नसल्याने शरीर पडण्यापूर्वीच नित्यसिद्ध अमरतेचा अनुभव होईल.

असत्‌चा भाव (सत्ता) नाही आणि सत्‌चा अभाव नाही— "**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः**" (गीता २।१६) सत् सतच आहे आणि असत् असतच आहे. म्हणून सतचेही भय नाही आणि असतचेही भय नाही. जरी भय ठेवले तरीही शरीर मरेल आणि भय ठेवले नाही तरीही शरीर मरेल. जे मरणारे आहे तेच मरेल, मग नवी हानी काय झाली ? म्हणून मृत्युपासून भयभीत होणे व्यर्थच आहे.



# १. संघर्षाचे कारण

आजकाल असा प्रकार केला जातो की, जातीभेदामुळेच समाजात संघर्ष उत्पन्न होत आहे, म्हणून जातीभेद मानू नयेत. अशी मान्यता अत्यंत चूक आहे. वास्तविक संघर्ष जातीच्या अनुषंगाने होत नाही, तर अहंकाराने उत्पन्न होणाऱ्या स्वार्थ आणि अभिमान यामुळे होतो.

सृष्टीत जातीभेद स्वाभाविक आहेत. निरनिराळ्या देशामध्ये मनुष्यांच्या अनेक जाती विद्यमान आहेत. केवळ माणसातच नाहीत, तर पशु-पक्षी, वृक्ष वेली इत्यादीमध्येसद्धा जातीभेद स्वाभाविक विद्यमान आहेत. गाय, म्हैस, मेंढा, शेळी, घोडा, उंट, कुत्रा इत्यादींच्या अनेक जाती आहेत आणि त्यांच्या एका-एका जातीमध्येसुद्धा अनेक भेद आहेत. जातीवरूनच त्यांच्या गुणांची ओळख होते. यांचा क्रय-विक्रय करणारे लोक यांच्या जातीशी चांगल्या प्रकारे परिचित असतात. जाती पाहूनच त्यांचे मूल्य केले जाते. त्याचप्रमाणे वृक्षांमध्येही एका एका वृक्षाच्या अनेक जाती असतात. फळे तसेच भाज्यात आणि धान्यातसुद्धा अनेक जाती आहेत. या जातीभेदाचे कारण हे आहे की, सृष्टी विषम आहे आणि यात एक सारख्या दिसणाऱ्या दोन वस्तूसुद्धा वास्तविक सारख्या नसतात. म्हणून विरोधाचे कारण जाती नाही. स्वार्थ आभिमानामुळेच सर्व विरोध उत्पन्न होतो, जी आसुरी संपत्ती आहे.

एक गोष्ट ही देखील पाहण्यात येते की वेगवेगळ्या जातीमध्ये परस्पर भांडण अथवा विरोध नसतो, तर एकाच जातीत परस्पर स्वार्थ आणि अभिमान या कारणाने विरोध होतो. जसे पुरुष जातीचा पुरुष जातीशी आणि स्त्री जातीचा स्त्री जातीशी विरोध होतो. पशूतदेखील नराचे नराशीच आणि मादीचे मादीशीच भांडाण होते. जसे कुत्रा कुत्र्याशीच भांडतो आणि कुत्री कुत्रीशीच भांडते, दुसरा या भांडणात केवळ सहाय्यक होतो. वानरातही वानरींच्या समूहात एक नर वानर असतो. जर एखाद्या वानरीला नर बाळ जन्माला आले तर ती त्याला घेऊन

पळून जाते, कारण स्वत:च्या भोगाचा स्वार्थ असल्यामुळे वानर त्या नर बाळाला मारून टाकतो, परंतु मादी बाळ जन्मली तर तिला मारीत नाही. हीच गोष्ट कुत्र्यामाध्ये देखील पाहण्यास मिळते. नर बाळ जन्मले तर कुत्रा त्याला मारून टाकतो आणि मादी जन्मली तर कुत्री त्याला मारून टाकते.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांच्यात परस्पर भांडण अथवा विरोध नसतो. ब्राह्मणाचा ब्राह्मणाशी, क्षत्रियाचा क्षत्रियाशी, वैश्याचा वैश्याशी आणि शूद्राचा शूद्राशी विरोध असतो, तात्पर्य जेथे निर्वाहाचा एकच विषय असतो, तेथेच स्वार्थामुळे भांडणे होतात. जर सर्व कामात सर्वांचा अधिकार मानला गेला तर त्यामुळे फार मोठा संघर्ष वाढेल. कारण असे मानल्याने ज्या निर्वाहापासून अधिक पैसा, मान-सम्मान इत्यादी प्राप्त होतील, सर्वलोक तेच करतील आणि ज्या निर्वाहापासून पैसा, मान-सन्मान इत्यादी कमी प्राप्त होतील, तो कोणीही करणार नाही. उच्च श्रेणीचे काम सर्वजण करू इच्छितील, परंतु कनिष्ठ श्रेणीचे काम कोणीही करू इच्छिणार नाही. जसे पूर्वी राज्यासाठी केवळ राजपूतच लढत होते, परंतु आता राज्यासाठी सर्वच लढतात. पूर्वी चारही वर्ण आपापले कार्य करीत होते, परंतु आता चारही वर्णांच्या कामात सर्वांचा अधिकार असल्याने संघर्षसुद्धा कमीत-कमी सोळा पट तरी वाढेलच. पूर्वी लोक आपाल्या वर्ण आणि आश्रमाच्या मार्यादेत चालत होते आणि सुख शांतीपूर्वक राहत होते. परंतु आज वर्णाश्रमाच्या मर्यादा नष्ट करून स्वार्थवश अनेक पक्ष बनत आहेत, जे राज्य मिळविण्यासाठी हिंदूच हिंदूचा नाश करीत आहेत. माता, पिता आणि पुत्र—हे तिन्ही वेगवेगळ्या पक्षांना आपले मतदान करतात आणि घरात परस्पराशी भांडतात. प्रचार तर असा केला जातो की, सर्वात परस्पर एकता झाली पाहिजे, परंतु वास्तविक एक-एकता अशी होत आहे अर्थात माता वेगळी, पिता वेगळा, पुत्र वेगळा, भाऊ वेगळा— सर्व एक-एकटे होत आहेत. याचे काण असे आहे की, वर्णाश्रमाची

रचना तर मार्यादा, कर्तव्य यांच्या अनुषंगाने झाली होती, परंतु पंक्षाची रचना स्वार्थापोटी झाली आहे.

स्वार्थ आणि अभिमानामुळेच वेगवेगळ्या वर्ण, आश्रम, सांप्रदाय इत्यादींच्या मानवात आपल्या वर्णादीचा पक्षपात राहतो, ज्यामुळे ते आपल्या वर्णादीचे मंडन आणि दुसया वर्णादीचे खंडन करतात. या विषयात एक कहाणी आहे. एक वेश्या होती. तिच्या मनात एकदा आपले कल्याण कसे होईल असा विचार आला. स्वतःच्या कल्याणाच्या उद्देशाने ती साधूंच्याकडे गेली त्यांनी तिला साधूंचा संग करण्यासाठी सांगितले. साधू त्यागी असतात, म्हणून त्यांची सेवा करशील तर तुझे कल्याण होईल. नंतर ती ब्राह्मणाकडे गेली तर त्यांनी साधू ढोंगी असतात, परंतु आम्ही जन्मजात ब्राह्मण आहोत असे सांगितले. ब्राह्मण सर्वांचा गुरू असतो, म्हणून तू ब्राह्मणांची सेवा कर म्हणजे तुझे कल्याण होईल. यानंतर ती संन्याशांकडे गेली तर त्यांनी म्हटले की, संन्यासी सर्व वर्णांचा गुरू असतो, म्हणून संन्याशाची सेवा केल्याने तुझे कल्याण होईल. मग ती विरक्त लोकांकडे गेली तर त्यांनी, सर्वामध्ये विरक्त फार कडक असतो, त्यांची सेवा करशील तर तुझे कल्याण होईल, असे सांगितले. मग ती वेगवेगळ्या सांप्रदायांच्या प्रमुखांकडे गेली, तर त्यांनी, आम्ही सर्वात उच्च आहेत, बाकीचे सर्व पाखंडी आहेत. तू आमची शिष्या हो, आमच्याकडून मंत्र घे, मग तुला आम्ही ती गोष्ट सांगू, ज्यामुळे तुझे कल्याण होईल. अशाप्रकारे वेश्या जेथे जेथे गेली, तेथे-तेथे तीला आपापल्या वर्ण, आश्रम, मत, सांप्रदाय इत्यादींचा पक्षपात दिसून आला. हे पाहून तिला असा विचार आला की, आता तत्त्व समजले युक्ती हाती लागली, साधू साधूंना पूज्य माना म्हणतात, ब्राह्मण ब्राह्मणांना पूज्य माना म्हणतात, तर मग आपण वेश्यांची पूजा का करू नये? असा विचार करून तिने वेश्यांना जेवण देण्याचा कार्यक्रम ठरविला. सर्व वेश्यांना आमंत्रण दिले गेले, निश्चित समयावर सर्व वेश्या तेथे येऊ लागल्या.

त्या गावाच्या बाहेर एक विरक्त त्यागी संत राहत होते. त्यांनी आज काय गडबड आहे याची चौकशी केली तेव्हा त्यांना असे कळून आले की, आज वेश्या एकत्र भोजन करण्याचा कार्यक्रम करीत आहेत, म्हणून वेश्यांना क्रियात्मक उपदेश देण्यासाठी ते त्या स्थानावर पोहचले. स्वयंपाक होत होता. स्वयंपाक्याने भाताची पेज नालीत ओतली. वेश्या गच्चीवर उभी राहून जिकडे पाहत, तिकडे बाबाजी बसले आणि नालीमधील पेजेने हात धुवू लागले. वेश्येने ते पाहिले आणि म्हणाली, बाबाजी हे कय करीत आहात? बाबाजी म्हणाले, तू आंधळी आहेस काय? तुला दिसत नाही, मी तर माझे हात धूत आहे? वेश्येने बाबाजीना तसे करण्या पासून रोकले परंतु त्यांनी ऐकले नाही. वेश्या उतरून खाली आली आणि म्हणाली, बाबाजी हे तांदळाचे पाणी आहे, याने तर हात अधिक मळतील, तुम्ही स्वच्छ पाण्याने हात धुवा. बाबाजी म्हणाले जर याने हात मळतील तर वेश्या काय निर्मळ, शुद्ध असतात की, ज्यांची सेवा केल्याने कल्याण होईल? स्वच्छ पाण्याने हात स्वच्छ होतात की, अस्वच्छ पाण्याने? हे ऐकून वेश्या जागृत झाली की, बाबाजी गोष्ट तर खरी सांगत आहेत. तर मग कल्याण कशाने होइल? बाबाजी म्हणाले—ज्या संताच्या ठिकाणी कोणत्याही एखाद्या मत, सांप्रदाय इत्यादींचा पक्षपात, आग्रह नसेल, ज्यांचे आचरण शुद्ध असेल, ज्यांच्या अंतःकरणात जीवाचे कल्याण कसे होईल, हाच एक भाव असेल, तसेच ज्यांना कशाचीच कामना नसेल, ते संत मग स्त्री असोत अथवा पुरुष, साधू असोत अथवा ब्राह्मण, कोणत्याही वर्ण, आश्रम, सांप्रदाय इत्यादींचे का असेनात त्यांचा संग करावा, त्यांचे बोल श्रवण करावे म्हणजे कल्याण होईल.

तात्पर्य हे निघाले, की जेथे स्वार्थ आणि अभिमान असेल, भोग आणि संग्रहाची इच्छा असेल, तेथे आसुरी संपत्ती येणारच, जेथे आसुरी संपत्ती येईल तेथे शांती राहणार नाही उलट अशांती राहील, संघर्ष होत राहील आणि पतन होईल.



[साधकको चाहिये कि वह एकान्तमें बैठकर शुद्ध वृत्तिसे इस पुस्तकके अन्तर्गत '**वर्णनातीतका वर्णन**' नामक लेखको पढ़े। केवल शब्दोंपर दृष्टि न रखकर अर्थ एवं तत्त्वकी तरफ दृष्टि रखते हुए पढ़े, पढ़कर विचार करे और विचार करके बाहर-भीतरसे चुप हो जाय तो तत्त्वमें स्वतःसिद्ध स्थिरता जाग्रत् हो जायगी अर्थात् सहजावस्थाका अनुभव हो जायगा और मनुष्यजीवन सफल हो जायगा।]

**—सहज साधना नामक पुस्तकसे**

Code 1006▲